# ज्ञान-सिंधु

आणि

# इतर लघुकथा

लेखक

**प्रो० विनायक सदाशिव गोगटे, एम्. ए.**

तेलंग गोल्ड मेडॅलिस्ट

'नीतिशास्त्रविचार' या पुस्तकाचा कर्ता

सेक्रेटरी टु दी डायरेक्टर, ॲकॅडेमी ऑफ फिलॉसफी ॲंड
रिलिजन, पुणें ( डेक्कन जिमखाना ).

आवृत्ति १ ली ]· [ प्रती २०००

जून १९२७

किंमत ८ आणे

# कृतज्ञता

—!

तुझ्या उदरांत माझ्या अल्पशा आयुष्यांतील कितीतरी सुखमय व हृदयस्पर्शी आठवणी दडलेल्या आहेत! भविष्य-काळांतील बिकट व संकटमय प्रसंगांसाठीं नव्हे, तर तूं हिरावून घेतलेल्या पूर्व-स्मृतींचें तात्पुरतें सुख अनुभविण्या-साठींच मला जगावेंसें वाटतें.

परंतु या आनंदमय आठवणींबरोबरच ज्या अनेक दुःखमय व कटु विस्मृतींना तूं मजपासून पूर्णपणें दडविलें आहेस, त्यांनीं माझें अधिक कल्याण झालें आहे, व त्यांमुळें मला या जगां-तील नवीन नवीन धक्के सोसण्याचें सामर्थ्य आलें आहे. तेव्हां त्या अनेक

## विस्मृतींना

मी ही अल्पशी कृति बहाल करितों. मात्र त्यांनीं या कृतीसही आत्मसात् करून तिस जगापासून लपवूं नये!



# विषयप्रवेश

प्रस्तुत छोट्याशा पुस्तकांतील लघुकथा कथानक-विशिष्ट नसून ध्येय-विशिष्ट आहेत. मनुष्यस्वभावांतील बारीक बारीक छटा दर्शवाव्या, त्यांतून निघणारा बोध, इच्छा असल्यास घेतां येईल इतक्या बेतानें ध्वनित करावा, अगर एकाद्या सामाजिक प्रश्नाची एकादी बाजू विचाराकरितां पुढें मांडावी, अशा हेतूनें या लघुकथा लिहिलेल्या आहेत. सर्वसाधारण स्त्री-पुरुषांचीं मनश्चित्रें रेखाटण्याचा हेतु असल्यामुळें, या कथांमध्यें सर्वगुणसंपन्न असे धीरोदात्त नायक सांपडणार नाहींत, व नायिकाही गुणरूपांनीं पृथ्वीला साजतील अशाच दिसतील. तसेंच, लघुकथांतील हेतु साध्य झाल्याबरोबर त्यांतील पात्रांची रजा घेतलेली आहे. कारणापुरताच त्यांच्याशीं संबंध ठेविल्यामुळें, त्यांचा पुढें संसार थाटून त्यांच्या अंगाखांद्यावर मुलेंबाळें बागडूं लागलीं कीं नाहीं, अगर सद्गुणी पात्रांचें जीवन सुखमय व मंगलमय होऊन जाऊन दुर्गुणी पात्रांना हटकून शासन झालेंच कीं काय, याबद्दल लेखकास फारशी माहिती नाहीं; तीसाठीं प्रिय वाचकांना आपल्या कल्पनाशक्तीवरच अवलंबून राहावें लागणार. असो. वर दिलेले हेतु या लघुकथांमध्यें साध्य झालेच असतील असें नाहीं, पण तसा प्रयत्न केलेला आहे. वरील जराशी अवास्तव व लांब प्रस्तावना, वाचकांनीं कोणत्या दृष्टीनें या लघुकथा वाचाव्या हें सांगावें यासाठीं केली आहे. इंग्रजीमध्यें अशा तऱ्हेच्या कादंबऱ्या व लघुकथा लिहिण्याचा उपक्रम एच्. जी. वेल्स् यानें प्रामुख्यानें केला आहे. प्रस्तुतचा अल्पसा प्रयत्न त्याच्या ग्रंथांच्या वाचनाचेंच फळ होय.

प्रस्तुत कथासंग्रह प्रकाशित करण्याचें काम माझे मित्र श्री० दिगंबर गणेश दामले यांनीं मोठ्या हौसेनें आपल्या अंगावर घेतलें याबद्दल त्यांचे, व माझे तितक्याच जिव्हाळ्याचे स्नेही श्री० आप्पासाहेब गोखले यांनीं

मुद्रणाचे बाबतींत प्रकाशकांना व मला मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत.

प्रस्तुत संग्रहांतील कांहीं लघुकथा पूर्वीं 'रत्नाकर' मासिकांत प्रसिद्ध झालेल्याच आहेत. चौथ्या गोष्टीपैकीं बराच भाग 'विविधवृत्ता'मध्यें प्रसिद्ध झालेला आहे.

पुस्तक लिहीत असतां किती अडचणी आल्या व तें छापून होण्यापूर्वीं कोणकोणतीं संकटें उपस्थित झालीं हें निवेदन करून वाचकांची क्षमाबुद्धि जागृत करण्याच्या भरीस न पडतां, त्यांनीं संथपणानें प्रस्तुत लघुकथा वाचाव्या येवढी मात्र त्यांस मी विनंति करितों !

अध्यात्म विद्यापीठ, पुणें
( डेक्कन जिमखाना )
ता. २५ जून १९२७

वि. स. गोगटे.

# चार शब्द

प्रस्तुत लघुकथासंग्रह वाचकांचे हातीं देण्यास आम्हांस फार आनंद होत आहे. प्रो० वि. स. गोगटे यांचें नांव आतां मराठी वाचकांच्या पूर्ण परिचयाचें आहे. नीतिशास्त्रासारख्या तात्त्विक विषयावर मार्मिक ग्रंथ लिहून व निरनिराळ्या नियतकालिकांतून लेख व गोष्टी लिहून त्यांनीं थोड्याच अवधींत मराठी भाषेची बरीच सेवा केली आहे. प्रस्तुत लघुकथा त्यांनीं एका विशिष्ट हेतूनें व पद्धतीनें लिहिलेल्या आहेत. तो हेतु कोणता हें त्यांनीं आपल्या विषयप्रवेशांत निवेदन केलेंच आहे. आधुनिक लघुकथांमध्यें प्रो० गोगटे यांच्या लघुकथांचा दर्जा किती उच्च आहे हें आम्हीं सांगण्यापेक्षां तें काम रसिक व गुणज्ञ वाचकांवरच सोंपविणें बरें. त्यांनीं हा संग्रह प्रसिद्ध करण्यास आम्हांस परवानगी दिल्याबद्दल त्यांचे, व विजय छापखान्याचे मालक श्री० गोखले यांनीं हें पुस्तक अत्यंत थोड्या अवधींत परंतु त्यांच्या लौकिकास अनुसरून अतिशय सुबक रीतीनें छापून दिल्याबद्दल त्यांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों. पुस्तक-प्रकाशनाचा हा आमचा पहिलाच प्रयत्न आहे, तो वाचक गोड करून घेतील अशी आशा आहे.

२७०, शनिवार पेठ,
पुणें शहर.

**दि. ग. दामले,**
प्रकाशक.

# अनुक्रमणिका


आणखी कांहीं लघुकथा
लवकरच पुस्तकरूपानें प्रसिद्ध होतील.

# ज्ञान-सिंधु

आणि

# इतर लघुकथा

## ज्ञान-सिंधु



माझे आजोबा-वडिलांचे चुलते-कमींत कमी लाख दीड लाखाचे धनी असावेत असा गांवांतील सर्व लोकांचा ग्रह असे. गांवांतील लोकांचा म्हणण्याचें कारण, मला त्यांच्या इस्टेटीची कार्डीइतकीही-अगर सुतळी-च्या तोड्याइतकीही-माहिती नव्हती. तरी पण ते बरेच श्रीमंत असले पाहिजेत याविषयीं मला मुळींच संशय नव्हता. माझे वडील व चुलते-आजोबांचे एकुलते एक चिरंजीव-मी विशीच्या आंत असतांनाच वारले होते. मुला-च्या मागोमाग आजोबांच्या कुटुंबानेंही लवकरच स्वर्गाची वाट धरल्या-मुळें आजोबांना आतां माझ्याखेरीज नात्याचें असें कोणीच नव्हतें. त्यांतून त्यांचें आतां वयही बरेंच झालें होतें; परंतु त्यांच्या विक्षिप्त अगर माझ्या छंदी स्वभावामुळें ते मला नेहमीं दूरच ठेवीत. मीही तारुण्याच्या जोमांत असल्यामुळें त्यांची कधीं पर्वा केली नाहीं. माझ्या वडिलांनीं मागें ठेविले-ल्या थोड्याबहुत पैशांवर हात मारीत व संसारांतील बहुतेक सुखें अनुभवीत मी दिवस घालवीत होतों. माझा धंदा कापसाचे सट्टे करण्याचा. हा धंदा अत्यंत किफायतशीर असून त्यांत दोनचार वर्षांच्या अवधींतच आपण लक्षा-धीश होऊं असें त्या धंद्यांतील माझ्या प्रेमळ मित्रांनीं माझ्या डोक्यांत भर-वून दिलें होतें, व पहिल्यापहिल्यानें माझा खरोखरच फायदा झाल्यामुळें

मलाही त्यांचें म्हणणें पूर्णपणें पटलें होतें. पाहिल्या वर्षाच्या अखेरीस मला हजार रुपये नफा झाला, व पहिला डाव देवास अगर देवीस द्यावा म्हणून मीं आपल्या देवीस आठशें रुपयांची कुडीं केलीं. प्रमिलेस तर तीं कुडीं कोठें ठेवूं आणि कोठें नको असें होऊन गेलें. माझ्या धंद्याच्या चांगुलपणाबद्दलचा तिचाही संशय आतां दूर झाला.

पण पाहिल्या वर्षानंतर माझ्या व्यापारास उलट दिशा लागली. फायदा होण्याचें बाजूलाच राहून मला प्रत्येक सट्टयांत बूड येऊं लागली. माझे मित्र मला, 'अरे, त्यांत काय आहे, एखादे वेळीं असें व्हायचेंच. थोडे दिवस दम धर. येवढी ग्रीको-जर्मन लढाई संपूं दे, मग पहाशील', असें म्हणूं लागले. खरें म्हटलें तर मला ग्रीको-जर्मन युद्धाच्या कारणांची जितकी माहिती होती तितकीच तें युद्ध थांबणें व माझा फायदा होणें यांतील कार्यकारणसंबंधाची माहिती होती. परंतु माझ्या मित्रांच्या आग्रहामुळें व त्यांचें म्हणणें खरें ठरेल या आशेमुळें मीं तसाच आंतबट्टयाचा व्यापार चालूं ठेविला होता. त्यांच्याच आग्रहामुळें मला थोडथोडी दारू पिण्याची संवय लागली होती व ही गोष्ट आजोबांच्या कानांवरही गेली होती; पण माझ्या मूळच्या पापभीरु स्वभावामुळें व प्रमिलेच्या विनवण्यामुळें मी मोठ्या प्रयासानें तींतून लवकरच मुक्त झालों.

माझे आजोबा विक्षिप्त होते असें मीं म्हटलें; पण त्यांस विक्षिप्त तरी काय म्हणून म्हणावें ? त्यांना वाचन-लेखनाचा अतिशय नाद होता, दुसऱ्या कशांतही ते फारसें लक्ष घालीत नसत, म्हणून मी त्यांस विक्षिप्त म्हणतों काय ? पण असें म्हटल्यास जगांतील प्रत्येक मनुष्यास विक्षिप्तच म्हणावें लागेल. मला नव्हता का सट्टेबाजीचा नाद ? सट्टे करण्यापेक्षां तर लेखनाचा नाद बरा ना ? कोणाला संगीताचा, कोणाला शिकारीचा, कोणाला काव्य करण्याचा, प्रत्येकाला कांहीं ना कांहीं नाद असतोच. किंबहुना त्यांतच प्रत्येक व्यक्तीचें वैशिष्ट्य असतें; मग त्याबद्दल त्याला विक्षिप्त म्हणणें म्हणजे त्यास एक व्यक्ति म्हणण्यासारखेंच होत नाहीं का ? वाईट नादाबद्दल वाईट म्हणणें आणि कोणत्याही नादाबद्दल विक्षिप्त म्हणणें यांत फार फरक आहे; पण तो आज मला समजतो आहे. तोच त्या वेळीं समजत असता तर आजोबांच्या लेखनाच्या नादाबद्दल मीं त्यांचा मनांतून

उपहास केला नसता. असो. आजोबांना लेखन-वाचनाचा अत्यंत नाद होता एवढें मात्र खरें. मी त्यांच्याकडे मधून मधून जात असे; पण त्या वेळीं माझी अगर माझ्या कुटुंबाची मुळींच वास्तपुस्त न करतां ते लगेच आपण लिहिलेल्या एकाद्या पुस्तकांतील उतारे मोठ्या प्रेमानें वाचून दाखविण्यास सुरुवात करीत. त्या वेळीं त्यांना इतका गहिंवर येई कीं, तितका जर माझ्या दारिद्र्याबद्दल येईल तर किती बरें होईल असें मला वाटे. मनुष्यस्वभाव किती नीच असतो पहा! त्यांनीं मोठ्या परिश्रमानें लिहिलेल्या त्या पुस्तकांची मला मुळींच किंमत वाटत नसे, आणि त्यांच्या मदतीला मी मुळींच पात्र नसतां, मला मात्र त्यांनीं मदत करावी असें मला नेहमीं वाटत असे.

अशाच एका सकाळीं मी त्यांना भेटावयास गेलों होतों. आदलेच दिवशीं मला एका सट्ट्यांत मोठी ठोकर बसून मजजवळची रोकड शून्य झाली होती. आज कांहीं तरी गोष्ट काढून माझ्या कमनशिबाची हकीगत आजोबांच्या कानावर घालावी व कांहीं उपयोग होतो का पहावें म्हणून मी सकाळींच त्यांच्या बंगल्यावर गेलों होतों. आजोबा नुकतेच चहा आटोपून आपण लिहिलेल्या एका पुस्तकाचीं पानें प्रसन्न मुद्रेनें चाळीत आपल्या नेहमींच्या आरामखुर्चीवर पडले होते. एवढा मोठा दिवाणखाना पण सारा पुस्तकांनीं भरलेला. बाहेर पाटी लावण्याचा अवकाश, तें अगदीं तारापोरवाल्याचें दुकान शोभण्याजोगें होतें. मला पाहतांच चष्मा कपाळावर सरकावून, “ ये माधव, बैस. हा मुद्दा तुला कसा काय वाटतो सांग ”, असें म्हणून त्यांनीं त्या पुस्तकांतील एक लांबलचक उतारा वाचून दाखविण्यास सुरुवात केली. त्या पुस्तकाचें नांव ‘इटली व हिंदुस्थानची शेती’ असें होतें. माझे आजोबा खरोखरच मोठे विद्वान् होते. पण कधीं कधीं त्यांच्या पुस्तकांचीं नांवें व विषय मात्र बरेच विचित्र असत. त्याचें कारण आधुनिक पाश्चात्य ग्रंथकारांचें अनुकरण हें असावें. उदाहरणार्थ, ‘उत्क्रान्तिवादाचा गणितावर परिणाम’,‘औद्योगिक सुधारणा आणि संमतिवय’, ‘उत्तरध्रुव आणि म्युनिसिपालिट्या’, इत्यादि अनेक गहन व गुंतागुंतीच्या विषयांवर–अगर मूळच्या अगदीं भिन्न विषयांची गुंतागुंत करून–त्यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं होतीं व त्यांतील बरीचशी गुंतागुंत माझ्या

डोक्यांत उतरविण्याचा ते यत्न करीत. परंतु मी त्यांचे घरीं जाण्याचे आदले रात्रीं नेहमीं जाग्रण करीत असल्यामुळें ते वाचीत असतां मी खुशाल डुलक्या घेई व अशा रीतीनें त्या ज्ञानजालांतून स्वतःचें डोकें सुरक्षित आणि सपाट ठेवीत असे. बऱ्याच वेळानें आजोबांनीं पुस्तक मिटलें व ते कुतूहल-पूर्ण नजरेनें मजकडे पाहूं लागले. परंतु लिहिण्याप्रमाणेंच बोलण्याचाही त्यांना नाद असल्यामुळें ते पुन्हा बोलूं लागले व त्या मुद्द्यावरील आपलें मत देण्याचा माझ्यावरील प्रसंग टळला. पण मला हवा होता तो विषय निघेना. शेवटीं मोठा धीर करून, "आजोबा, काल माझे हजार रुपये व्यापारांत बुडाले" असें मीं त्यांस म्हटलें. त्याबरोबर, "काय व्यापारांत बुडाले ? बरोबरच आहे. आमच्या तरुणांना व्यापारांतील मख्खी अजून मुळींच समजलेली नाहीं. यावर माझ्या 'मानसशास्त्र व आमचा व्यापार' या पुस्तकांतील विवेचन तूं वाचलेलें दिसत नाहीं. काय उत्तम विवेचन झालें आहे तें !" असें म्हणून ते उठले व तें पुस्तक काढून त्यांतील उतारे वाचून दाखविण्यास त्यांनीं सुरुवात केली. कोठून मीं आपली कर्म-कथा त्यांना सांगितली असें मला होऊन गेलें; कारण त्या कर्मकथेला जोड म्हणून ही कर्मकटकट सुरू झाली. वाचणें संपल्यावर ते किंचित् थांबले व नंतर मोठ्या गंभीरपणानें म्हणाले, "माधव, तूं वयानें मोठा झालास तरी ज्ञानानें अजून लहानच आहेस. या जगांत किती अफाट ज्ञानसिंधु भरलेला आहे ! त्यांतून कितीही ज्ञान आपण शोषून घेतलें अगर दुसऱ्यास दिलें तरी तो यत्किंचितही कमी होत नाहीं, उलट वाढतच जातो. म्हणून म्हणतों तूं मजकडे वरचेवर येत जा, रोज येत जा, व माझ्या ज्ञानाचा व मीं मिळविलेल्या माहितीचा फायदा घेत जा. मी इतका सर्व खटाटोप करतों हा कोणाकरितां ? तुझ्याकरितां !"—मी कान टवकारून ऐकूं लागलों—"तुझ्याकरितां, सर्व जनतेकरितां, देशाकरितां !" माझी पूर्ण निराशा झाली. मिळविलेली सर्व संपत्ति माझ्याकरितांच आहे असा त्यांच्या पहिल्या वाक्यार्धाचा मीं अर्थ करणार इतक्यांत पुढील वाक्यार्धानें त्या अर्थाचा अनर्थ होऊन आजोबा मूळपदावर आले. त्यांनीं तयार केलेल्या त्या प्रचंड सिंधूपेक्षां त्यांतील एकच रत्न—लक्ष्मी—मला मिळेल तर पुरे असें मला वाटत होतें, इतका मी अल्पसंतुष्ट होतों, पण माझे आजोबा अत्यंत उदार !

विषण्ण हृदयानें मी घरीं गेलों. प्रमिला माझी वाट पहात दारांतच उभी होती. आमच्या मुलाखतींतून काय निष्पन्न झालें हें माझ्या चर्येवरूनच तिनें ओळखलें. आतां आमची स्थिति फारच बिकट झाली होती. यापुढें तो सट्टयाचा व्यापार करण्याची सोयच नव्हती. दुसरा एखादा धंदा करावा म्हटलें तर भांडवल तरी कोण देणार ? मीं सट्टयाचा धंदा सोडला असें कळल्याबरोबर मला उत्तेजन देणारे सर्व प्रेमळ मित्र तोंड चुकवूं लागले. शेवटीं माझ्या देवीनें आपला नैवेद्य–तीन वर्षांमागें घेऊन दिलेलीं तीं कुडीं–मला परत दिलीं, व लज्जायुक्त अंतःकरणानें मीं त्यांचा स्वीकार केला ! आपल्या अधःपाताची ही मुहूर्तमेढ आहे असें माझें मन मला सांगूं लागलें. मीं चारशें रुपयांना तीं कुडीं विकलीं व त्या भांडवलावर एक लहानसें स्टेशनरी सामानाचें दुकान थाटलें. माझ्या उधळ्या व भिडस्त स्वभावाला पुरे पडून धंदा जितका चांगला चालणें शक्य होतें तितका तो चालूं लागला.

दोन वर्षें लोटलीं. एके दिवशीं संध्याकाळीं आजोबांचा गडी घाईघाईनें मजकडे आला व आजोबा फार आजारी असून त्यांनीं मला ताबडतोब भेटावयास बोलाविलें आहे असें सांगून गेला. मी तसाच उठलों व कपडे घालून त्याच्या मागोमाग आजोबांचे घरीं गेलों. रस्त्यानें जात असतां माझ्या मनांत कोणते विचार चालले असतील याचें वर्णन मी करीत नाहीं, कारण तसें करण्यास मला अत्यंत शरम वाटते. मजसारख्या अगदीं साधारण प्रतीच्या मनुष्याला शोभतील असेच ते विचार होते, इतकें सांगितलें म्हणजे पुरे. आजोबा खरोखरच अत्यवस्थ होते. मला पहातांच प्रेमार्द्र दृष्टीनें त्यांनीं मला जवळ बसण्याची सूण केली व ते खोल आवाजांत बोलूं लागले. “ माधव, तूं आतां मोठा झाला आहेस. तुझें तुला हिताहित कळतेंच आहे. तूं तें आपलें दुष्ट व्यसन–” मी दचकलों–‘ सोडून दिलें आहेस असें मीं ऐकलें. फार चांगली गोष्ट आहे. तर मी काय म्हणतों कीं, मीं आपला जन्म जसा विद्याव्यासंगांत घालविला तसाच तूंही घालवावास, व या ज्ञान-सिंधूंतील अमृत समाजाला पाजून त्याला अज्ञानांतून वर काढावेंस. मीं नुकतेंच लिहिलेलें—आयाई ! मला थोडें पाणी पाज–‘आधुनिक तरुणांचीं कर्तव्यें’ हें पुस्तक माझी शेवटची आठवण म्हणून मी तुला मोठ्या प्रेमानें नजर करीत आहें. तें नीट जतन कर, अगदीं जिवापलीकडे जतन

कर, व तें नीट लक्षपूर्वक वाचून त्याप्रमाणें वागण्याचा—" त्यांच्यानें पुढें बोलवेना. मी त्यांस 'समजलों' अशा अर्थाची सूण केली. आजोबांनीं उशाखालीं ठेवलेलें सोनेरी पुठ्याचें तें जाड पुस्तक कांपऱ्या हातांनीं माझ्या हातांत दिलें.

त्याच दिवशीं रात्रीं आजोबांचें प्राणोत्क्रमण झालें. माझा शेवटला आशातंतूही तुटून गेला. आजोबांना दुसरा कोणी जवळचा आप्त नसल्यामुळें ते मरतांना तरी आपली सर्व संपत्ति मला देऊन टाकतील अशी मला मोठी आशा होती. पण काय! ज्याची मला मुळींच आवड नाहीं अशा ज्ञान-सिंधूपलीकडे—त्या पुस्तकांपलीकडे—मला- कांहींच मिळालें नाहीं. रोजची भाकरी कशी मिळेल हीच मला आतां विवंचना व तेंच माझें कर्तव्य. त्या विवंचनेंत आजोबांच्या पुस्तकी पांडित्याचा मला काय उपयोग होणार? मी मनांतल्या मनांत त्यांच्यावर खूप संतापलों. आजोबांनीं स्पष्ट वुइल करून ठेविलें नसल्यामुळें अनेक अलगते गलबते त्यांच्या इस्टेटीवर आपला हक्क सांगूं लागले. माझा हक्क वास्तविक असूनही तो शाबीत होण्यास लागणारी पैशाची, लबाडीची व वकिलाची साधनसामुग्री मजजवळ नसल्यामुळें त्याही बाबतींत मी अगदीं निराश झालों होतों. या गोंधळांत आजोबांची इस्टेट सरकारी कुलुपांत व तीवर हक्क सांगणाऱ्यांची इस्टेट वकिलांच्या खिशांत, अशा रीतीनें बरेच दिवस लोटले. मजजवळ इस्टेटच नसल्यामुळें मी मात्र या गोंधळांतून अलिप्त राहिलों.

इकडे माझ्या नव्या धंद्यांतही मला यश मिळेना. वर सांगितलेल्याप्रमाणें माझा स्वभावच कोणत्याही धंद्याला अगदीं अननुरूप—म्हणजे उधळ्या व भिडस्त—असा होता; शिवाय माझी बुद्धिही चांगली होती, व लहानपणीं उनाडपणा जरा कमी केला असता व आजोबांच्या व्यासंगांत लक्ष घातलें असतें तर मी खरोखरच आजोबांचा नातू शोभण्यासारखा विद्वान् झालों असतों. पण आतां पश्चात्ताप करून काय उपयोग? बैल गेला आणि झोंपा केला. दिवसेंदिवस माझी स्थिति अत्यंत बिकट होत चालली. एखाद्या पेढीवर कोठें नौकरी मिळेल म्हणून खटपट केली; पण माझी नालायकी माझ्या गांवांत तरी जगजाहीर असल्यामुळें मला कोणी ठेवून घेईना. कुडीं तर मागेंच गेलीं होतीं; आतां प्रमिलेच्या किरकोळ दागिन्यांवरही माझी दुष्ट

नजर वळली व तिनेंही मोठ्या आनंदानें ते माझ्या हवालीं केले. शिवाय घरांतील कांहीं खुर्च्या टेबलें वगैरे विकून मीं पुन्हा थोडेंसें भांडवल उभारलें व एका स्नेह्याच्या मदतीनें एक जुन्या पुस्तकांचें दुकान काढलें. चारपांच वर्षें अतिशय मेहनत घेऊन व दारिद्र्यांत दिवस काढून दुकान कसें तरी चालविलें, पण निष्ठुर दैवाला तेंही न पाहवून त्यानें एक दिवस माझ्या दुकानावर अग्न्यास्त्र सोडलें व अर्ध्याअधिक दुकानाची राखरांगोळी केली !

आतां मात्र माझी कंबर खचली. झालेलें नुकसान भरून काढण्यास आतां मजजवळ कांहींही उरलें नव्हतें. आग लागली ती नेमकी मौल्यवान् पुस्तकांच्या कपाटांनाच लागल्यामुळें उरलीं होतीं तीं पुस्तकें अगदींच सटरफटर होतीं. नाहीं म्हणायला मजजवळ एक अत्यंत मौल्यवान् पुस्तक राहिलें होतें व तें म्हणजे आजोबांनीं मरतेवेळीं दिलेलें. पण तें विकण्याची कल्पना मला स्वप्नांतही शिवली नव्हती. स्वतःच्या व कुटुंबाच्या काळजीनें मी अगदीं खंगत चाललों व शेवटीं आजारी पडलों. घरांत तर रोजच्या चुलीचीही व्यवस्था नाहीं, तर औषधपाण्याची कोठून असणार? मी तसाच तापांत उठून दुकानावर जाई व जे काय चार दोन आणे मिळतील ते प्रमिलेजवळ आणून देई. अशा स्थितींत दोनतीन दिवस लोटल्यावर एक दिवस एक गृहस्थ माझ्या दुकानांत आले व 'आधुनिक तरुणांचीं कर्तव्यें' हें पुस्तक आपणांकडे मिळेल काय?' म्हणून चौकशी करूं लागले. मला त्या पुस्तकाचें नांव केव्हां तरी ऐकल्यासारखें वाटूं लागलें. आजोबांनीं मला एक पुस्तक दिलेलें मला स्मरत होतें व अंधश्रद्धेनें मीं तें जपूनही ठेविलें होतें; परंतु माझी ज्ञानलालसा इतकी अगाध कीं मीं त्याचें एक पानही उलटून पाहिलें नव्हतें व त्याचें नांवही माझ्या नीटसें लक्षांत नव्हतें. बरेंच डोकें खाजविल्यावर हेंच त्या पुस्तकाचें नांव अशी माझी खात्री झाली. पण तें पुस्तक विकावें कसें? आजोबांनीं मृत्युसमयींची शेवटली भेट म्हणून तें दिलेलें व तें अत्यंत काळजीपूर्वक जपून ठेवून वाचण्याविषयीं मोठ्या कळकळीनें सांगितलेलें. वाचणें नाहीं तर नाहीं, पण तें दुसऱ्यास देऊन टाकावें, आणि तेंही पैशाच्या लालचीनें? माझ्या अधोगतीची ही परमावधि होईल असें मला वाटूं लागलें. मी त्या गृहस्थास तें पुस्तक दुसरीकडून आणून देतों म्हणून सांगितलें; पण त्याची आवृत्ति संपल्यामुळें दुसऱ्या कोठेंही

तें मिळत नाहीं असें त्यानें उत्तर दिलें. मजजवळचें पुस्तक मला देतां येत नाहीं असें मीं त्यास निक्षून सांगितलें, पण त्यास त्याची अत्यंत गरज असल्यामुळें तो मला फारच गळ घालूं लागला, व त्या पुस्तकाच्या मूळ किंमतीच्या चौपट रक्कम, म्हणजे चाळीस रुपये त्यानें मला देऊं केले—नव्हे लगेच माझ्यासमोर ठेवले. क्षणभर—अगदीं एकच क्षण—माझें चित्त द्विधा झालें. नाहीं तरी आपण तें वाचणारच नाहीं, मग त्या बिचाऱ्या गरजू मनुष्यास तरी तें कां देऊं नये ? पण त्या पवित्र देणगीचा विक्रय! प्रमिला आपणांस काय म्हणेल ? बरें, त्यास तें फुकट देऊन टाकलें तर ? पण एवीं-तेवीं पुस्तक द्यावयाचेंच, मग निदान आपला फायदा तरी कां करून घेऊं नये ? शिवाय चाळीस रुपये म्हणजे कांहीं लहानसहान रक्कम नाहीं. महिना दीड महिना सहज निघून जाईल.

झालें. 'बुभुक्षितः किं न करोति पापम् ।' त्या झगड्यांत माझ्या स्वार्था-चा जय झाला. एकदां मनुष्याचें मन एखाद्या दिशेनें विचार करूं लागलें, कीं नदीच्या प्रवाहांत सांपडलेल्या पदार्थाप्रमाणें तें त्याच दिशेनें वाहूं लागतें. मी तर आतां पुरा निर्लज्ज बनलोंच होतों; प्रमिलेला सध्यां कांहीं तरी थाप मारून वेळ मारून न्यावी व मग तिला सर्व परिस्थिति समजावून सांगून तिचें सांत्वन करावें; प्रमिला समजूतदार आहे—काय मौज आहे पहा! असल्या क्षुद्र गोष्टीला संमति देणें हा आतां मला समजूतदारपणा वाटूं लागला—असा विचार करून मी त्या गृहस्थास घेऊन घरीं गेलों. सुदैवानें प्रमिला घरांत नव्हती, देवाला गेली होती; त्यामुळें तिला थाप मारण्याचा प्रसंग टळला. मी आंतल्या खोलींत गेलों व पेटीचें कुलूप उघडून कांपऱ्या हातानें तें पुस्तक बाहेर काढलें. क्षणभर मीं आपली माणुसकीच झुगारून देण्याकरितां हातांत काढून घेतली आहे असें मला वाटलें, व ती पुन्हा हृदयांत परत कोंबण्यासाठींच कीं काय, मीं तें पुस्तक छातीशीं घट्ट धरलें. डोळ्यांतून एक उष्ण अश्रुबिंदुही त्यावर पडला असावा. पण हें सारें क्षणिकच. आजोबांच्या घरून जें मीं तें पुस्तक पेटींत नेऊन ठेवलें होतें तें आज त्याला पुन्हा सूर्यदर्शन झालें. मीं पुन्हा आपलें मन घट्ट केलें, व सरावलेल्या दुकानदाराप्रमाणें त्या पुस्तकावरील धूळ झटकूं लागलों, तों त्यांतून एक लिफाफा खालीं पडला. घाईघाईनें

मी तो उचलून पाहूं लागलों, तों त्यावर माझें नांव व 'महत्त्वाचें' असा शब्द ठळक अक्षरांत लिहिलेला. हस्ताक्षर माझ्या आजोबांचें. आश्चर्यानें मी तर अगदीं गुंगच होऊन गेलों. इतका कीं, तो लिफाफा फोडण्याचेंही मला भान राहिलें नाहीं. इतक्यांत प्रमिला तेथें आली व कुतूहलपूर्ण दृष्टीनें मजकडे पाहूं लागली. लिफाफा फोडून वाचतांच आमचा दोघांचाही आनंद गगनांत मावेना. त्यांत आजोबांनीं केलेलें वुइल असून त्यांनीं आपली सर्व इस्टेट मला देऊन टाकली होती. हेंच पुस्तक जर मिळाल्याबरोबर वाचण्याची–निदान चाळण्याची–बुद्धि मला झाली असती तर इतके दिवस दारिद्र्यांत रहावें लागलें नसतें असें मनांत येऊन मला वाईटही वाटलें. 'या ज्ञान-सिंधूतून आपण कितीही ज्ञान शोषून घेतलें अगर दुसऱ्यास दिलें तरी तो आटत नाहीं, उलट वाढतच जातो,' हें आजोबांचें वाक्य माझ्या कानांत दुमदुमूं लागलें. नंचि हेतूनें प्रेरित होऊन तें ज्ञान मी दुसऱ्यास देण्यास उद्युक्त झालों तरीही तें मला हितकारकच झालें, व मला जें रत्न त्या सिंधूतून निघावयास हवें होतें तेंही त्यांतून भरपूर निघालें हें पाहून माझें अंतःकरण कृतज्ञतेनें व पश्चात्तापानें भरून आलें, व आपल्या मूर्ख-पणाबद्दल मी फारच खजील झालों. इकडे बाहेर तो गृहस्थ माझी वाट पहात बसलाच होता. एका महिन्याचे आंत त्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढण्याचें आश्वासन देऊन मीं त्यास वाटेस लावलें व आपल्या लाडक्या प्रमिलेस आतां किती रुपयांचीं कुडीं घ्यावीं याचा मनांतल्या मनांत हिशेब करूं लागलों.



# दरिद्री कुबेर



रात्रीं नऊ वाजण्याचा सुमार असेल. समुद्रकांठावरील गर्दी बहुतेक मोडली होती. पांढरें स्वच्छ, चांदणें पडलें असून त्या प्रकाशांत समुद्राच्या लाटा तलवारीच्या धारेप्रमाणें चमकत वरचेवर अंगावर धांवून याव्या त्याप्रमाणें उसळत होत्या. क्वचित् एकादा गंडेरीवाला, भज्ज्याऽ गरमवाला अगर पानपट्टीवाला परत जाण्यापूर्वीं एकदां शेवटलें गिऱ्हाईक मिळविण्यासाठीं ओरडत होता. दिवसभर ऑफिसच्या दगदगीनें माझें डोकें शिणून गेल्यामुळें मी समुद्रावर येऊन बराच वेळ एका कोंचावर आकाशाकडे पहात स्वस्थ पडून राहिलों होतों. मधूनमधून आजूबाजूंच्या राजशाही बंगल्यांतील दिव्यांच्या लखलखाटाकडे पाहून मला असें वाटे कीं, आपणांस अशा बंगल्यांत कां रहातां येऊं नये ? आपण येवढे सुशिक्षित व सामान्यतः सज्जन गणले जाण्यासारखे, पण आपण राहणार चाळीच्या खुराड्यांत. या भव्य राजवाड्यांतून राहणाऱ्या लोकांपैकीं कित्येकांस आपली सहीदेखील धड करतां येत नसेल आणि त्यांच्या व्यसनांची तर गणतीच करतां येणार नाहीं. जगांत असा अन्याय कां ? अशा तऱ्हेचे विचार माझ्या मनांत येत होते. माझा किंचित् डोळाही लागला असावा, पण लवकरच मी दचकून जागा झालों.

" आज फार उष्मा होतो आहे नाहीं ? "

माझ्या कोंचाखालून आवाज आला. मी ताडकन् उठून मागल्या बाजूस पाहिलें, तों जवळजवळ कोंचाखालींच निजलेला एक मनुष्य माझ्या दृष्टीस पडला. मी उठतांच तोही उठला, व अगदीं शांतपणें पुढें येऊन कोंचावर अगदीं माझ्या शेजारीं बसला, त्याचे कपडे सभ्य तऱ्हेचे परंतु अत्यंत मळके असे होते. अंगांत एक काळसर वुलन कोट, त्याच्या आंत तितकाच कळकट पडत्या कॉलरचा शर्ट, डोक्याला एक अगदीं जुनी फरकॅप व

पायांत बिनपायमोजानेंच घातलेला शू, असा त्याचा वेष होता. दाढी बरीच वाढलेली, व एकंदरीनें एकाद्या कचऱ्याच्या पेटींत बुडवून काढल्याप्रमाणें तो गलिच्छ दिसत होता. परंतु त्याच्या चेहेऱ्यावर तशाही स्थितींत एक प्रकारचा तजेला व डोळ्यांत विलक्षण बुद्धिमत्तेची चमक होती. त्याला पहातांक्षणींच, 'भाऊ, एक दिडकी द्या', असें तो म्हणणार असें मला वाटलें होतें, पण त्याची माझ्या शेजारीं येऊन बसण्याची धिटाई व उकाडा होत असल्याबद्दल त्यानें केलेली प्रस्तावना भीक मागण्यास मुळींच अनुकूल नव्हती. शिवाय त्याचा स्वरही केंविलवाणा नसून अगदीं प्रतिष्ठित व माझ्या एकाद्या मित्राला साजेल अशा सलगीचा होता.

"होय, पण समुद्रावर इतर ठिकाणांपेक्षां किती तरी अधिक गार वाटतें." मीं त्याला सरळ उत्तर दिलें. त्यानें आपण होऊन याचना केल्याखेरीज त्याला कांहींही द्यावयाचें नाहीं असें मीं ठरविलें होतें.

"खरेंच. शिवाय ही रात्रीची वेळ. दिवसभर आपण माणसें कोण यातायातींत असतों! आपली महत्त्वाकांक्षा, आपली द्रव्यार्जनाची चिंता, आपले उच्च उच्च मनोरथ, आपली ज्ञानार्जनाची व शोध लावण्याची तळमळ, या गोष्टी दिवसभर आपल्या डोक्यांत धुमाकूळ घालीत असतात. या विश्रांतीच्या वेळीं..."

हा जवळ जवळ भिकारी दिसणारा मनुष्य केवढ्या मोठमोठ्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगतो आहे हें पाहून मला बराच विस्मय वाटला, व त्याची थोडीशी कींवही आली. त्याचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच मीं त्याला उत्तर दिलें.

"महत्त्वाकांक्षा आणि ज्ञानार्जन अगर द्रव्यसंपादन या गोष्टींसाठीं दगदग आणि चिंता करावी लागते हें खरें, पण या गोष्टींपासून कांहीं फायदेही आहेत. सत्ता, ऐश्वर्य, सुखसोयी, यांचा लाभ असल्या खटपटीमुळेंच होतो. चार लोकांत मान्यता मिळते, चांगले नीटनेटके कपडे घालून गाड्यांघोड्यांतून हिंडतां येतें."

माझ्या शेवटच्या शब्दांनीं तो जरा चमकला. चांगल्या कपड्यांविषयीं मी बोललों ते शब्द त्याला खिजविण्यासाठीं असावेत असें त्याला वाटलें, असें मागाहून माझ्या लक्षांत आलें.

" समजलों. पण- पण माझ्यावर तुमचा विश्वास बसेलसें नाहीं मला वाटत; आणि तें एकप्रकारें बरेंच आहे. मला आतां कोणाला तरी सांगितल्यावांचून राहवत नाहीं, तें तुम्हांलाच सांगतों. तुम्ही फार भले गृहस्थ दिसतां."

हा मनुष्य काय बोलत आहे हें मला कांहींच उमजेना. येवढें विश्वास न बसण्याइतकें गूढ हा काय सांगणार आहे हें ऐकण्याची मला जिज्ञासा उत्पन्न झाली.

" काय सांगायचें आहे तुम्हांला ? " मीं त्याला प्रश्न केला.

" सांगतों. मी- मी हिरे तयार करतों." तो घुटमळत व इकडेतिकडे पहात म्हणाला. हा मनुष्य एकतर भ्रमिष्ट असावा, किंवा मुंबईत जे अनेक अक्षम्य, चोरीवजा धंदे चालतात ते करणारांपैकीं एक असावा असा मला संशय आला.

" काय, तुम्ही हिरे तयार करतां ? मी अलीकडे पुष्कळ नकली हिरे पाहिले आहेत. तुम्ही त्यांचे व्यापारी आहां वाटतें ?"

" हें पहा, मला या अविश्वासाचा अगदीं वीट आला आहे बुवा !" असें म्हणून त्यानें लगेच आपल्या आंतल्या खिशांत हात घालून एक पुरचुंडी बाहेर काढली व ती सोडून एक टपोरा, तजेलदार व अष्टपैलू हिरा काढून माझ्या हातीं दिला. तो हिरा पाहून माझे डोळे अगदीं दिपून गेले. क्षणभर, आकाशांतून एकादा ताराच तुटून माझ्या हातांत येऊन पडला आहे कीं काय असा मला भास झाला. मी कांहीं बोलणार इतक्यांत, " मी हा हिरा तुम्हांला शंभर रुपयांला देतों," असें तो अत्यंत हलक्या स्वरांत मला म्हणाला. तें ऐकून माझा त्याजविषयींचा संशय दृढ झाला. परंतु त्याच्या मुद्रेवर व बोलण्यांत अत्यंत गंभीरता भरलेली होती. माझा संशय त्याला उघड बोलून दाखविण्याचें मला धैर्य होईना, पण मीं त्याला साधारण खोंचदार असा प्रश्न विचारलाच.

" काय ? साऱ्या शंभर रुपयांला हा हिरा तुम्ही मला विकणार ? पण आधीं हा तुम्हीं पैदा कोठून केलांत ? "

" मी हिरे बनवितों म्हणून मघां सांगितलें ना ? आणा तो इकडे परत." असें म्हणून त्यानें चटकन् तो माझ्या हातांतून घेतला व लगबगीनें आपल्या खिशांत ठेवून दिला. तो पुन्हा बोलूं लागला.

" तुमचा मजवर विश्वास नाहीं ना ? कांहीं हरकत नाहीं. मी तुम्हांला सगळी हकीगत सांगणारच. मी हिरे बनवितों. मी या उद्योगास आपलें सारें आयुष्य वाहिलें आहे,-" मला त्याचें म्हणणें खरेंही वाटेना व खोटेंही वाटेना-" हं, काय म्हणालों मी ? मी या कार्यास आपलें आयुष्य वाहिलें आहे. आज तेरा वर्षें झालीं. मी आतां पसतीस वर्षांचा आहे. आज तेरा वर्षें झालीं, मला याशिवाय दुसरें कांहीं सुचत नाहीं, दिसत नाहीं. माझ्या वडिलांनीं मला पंचवीस हजार रुपये ठेविले होते, ते सगळे या, या हिऱ्यांच्या पायांत खर्च झाले. कसे तें सांगतों. तेरा वर्षांपूर्वीं माझ्या डोक्यांत ही कल्पना आली. कार्बन वायु पकडून तो एका भुकटींत-नांवें सांगितलीं असतीं, पण नको; तुम्ही माझा धंदा बुडवाल!-तो एका भुकटींत मिसळून त्याला उष्णता द्यायची, एकसारखी उष्णता द्यायची, काय समजलांत ? जास्त सांगत नाहीं. दहा वर्षें झगडलों, अनेक प्रयत्न व्यर्थ गेले; शेंकडों प्रयोग केले, फसले; पाण्यासारखे पैसे ओतले. कोणाला सांगायची चोरी. कोणी पाहील का ? कोणाला संशय येईल का ? ही भीति. दुसऱ्या कोणाला आपल्या शोधाचें रहस्य कळलें व त्यानें चलाखी करून आपल्यापुढें आघाडी मारली तर ?-हो, त्याचा काय नेम ? माझी बुद्धि कांहीं विशेष चलाख नाहीं. मग मला होणारा सगळा फायदा-"—त्याच्या चेहऱ्यावर स्मित चमकूं लागलें—" सगळें ऐश्वर्य—ऐश्वर्य काय थोडेंथोडकें आहे का ?—तोंच लुबाडून बसायचा. कोणाला न कळत मी रात्रंदिवस झटत होतों. इकडे पैसे सगळे प्रयोगाच्या पायीं संपून गेले. शोध तर पुरता होईना; आशा तर वाटत होती, नव्हे, जवळजवळ खात्री होती; पण प्रत्यक्ष हातांत फळ पडल्याखेरीज काय उपयोग ? इकडे उपाशीं मरण्याची पाळी आली."—मला आतां त्याचें बोलणें खरें वाटूं लागलें.—" फावल्या वेळांत कांहीं उद्योग करावा तर मला दुसरें काय येत होतें ? मी कांहीं फारसा शिकलेला अगर पदवीवाला नाहीं,"-मी पदवीधर असल्यामुळें त्याच्याकडे किंचित् आढ्यतेनें, थोडया भुंवया वर चढवून पाहूं लागलों—" जेमतेम मॅट्रिकपर्यंत मजल गांठली. मास्तर व्हावें म्हटलें तर शिकवितां येत नाहीं. या माझ्या ध्येय-विषया-शिवाय मीं दुसऱ्या गोष्टींकडे कधीं लक्षच दिलें नाहीं. खिशांत तर दिडकी

उरली नाहीं. कांहीं दिवस एक वेळां जेवलों, कांहीं दिवस चुरमुरे खाऊन राहिलों, घरांत रसायनें व बाटल्या यांखेरीज कांहीं राहिलें नाहीं. खुर्च्या विकल्या, घड्याळ विकलें, सगळें कांहीं विकलें. तेही पैसे खलास ! नंतर कांहीं दिवस वर्तमानपत्रें विकण्याचें काम केलें, हॉटेलांतील कपबशा धुतल्या. शेवटीं—शेवटीं–" तो खालीं मान घालून घुटमळूं लागला. मी अधीरपणें ऐकत होतों. त्याची हकीगतच इतकी चित्ताकर्षक होती कीं, मी ती ऐकण्यांत अगदीं तल्लीन होऊन गेलों होतों. तिच्या सत्यासत्यते- विषयीं आतां माझ्या मनांत विचारच येत नव्हता. "पुढें ?" मीं विचारलें. "शेवटीं एक आठवडाभर मीं भीक मागितली. पण तीही पुरती मिळेना. माझ्यासारख्या धडधाकट माणसाला कोण भीक घाल- णार ? एक दिवस एक उल्लू तरुण आपल्या छबकड्या मैनेस बरोबर घेऊन रस्त्यानें चालला होता. केवळ बायकोला झोंक दाखविण्यासाठीं त्यानें माझ्या अंगावर एक रुपया फेंकला. तो घेऊन मीं कोळसे विकत आणले, कारण माझ्या भट्टींत कोळसे नव्हते व त्यामुळें माझे प्रयोग थंड पडण्याच्या बेतांत आले होते. एकीकडे पोटांतली आग विझवायची, तर तिकडे भट्टींतली आग नेहमीं प्रज्वलित ठेवायची, अशी दुहेरी चिंता माझ्या मागें होती. त्यांत एक दिवस माझ्या औषधांना एकदम जास्त उष्णता लागून त्यांचा स्फोट झाला व तीं सगळीकडे उडून खोलीचीं तावदानें फुटलीं. खालच्या मजल्यावरचे लोक पूर्ण अडाणी होते, पण न जाणो, कोणाला संशययायचा, म्हणून मीं लगेच दुसरी निवांत जागा पाहिली व रातोरात सगळें सामान हलविलें. कोठें म्हणून सांगूं? पण जाऊंद्या, तुम्हांला त्याच्याशीं काय करायचें आहे ? तीन वर्षांपूर्वीं मला थोडें थोडें यश येऊं लागलें व आज दोन महिन्यांपूर्वीं हें–" खिशाकडे बोट दाखवून-"हें मूर्तिमंत ऐश्वर्य माझ्या हस्तगत झालें. यांतील एकेक हिरा लाख किंमतीचा आहे. एकाद्या राजाच्या मुकुटांत शोभेल असा आहे" हिऱ्यांचें वर्णन करतांना त्याचा आवाज बराच उंच चढला–"इतकें ऐश्वर्य माझ्या हातांत आलें; पण तें भोगावें कसें यापेक्षां तें दडवावें कसें याची- च काळजी मला अधिक येऊन पडली आहे. माझी नवी जागाही अगदीं एकीकडे, बोळांत होती, तेथें कोणीही येत नसे; पण एक दिवस काय झालें,

शेजारच्या घरांतील एक मनुष्य दारू पिऊन तर्रर होऊन मजकडे आला व माझ्या खोलींतील त्या असंख्य बाटल्या व ती अखंड पेटत असलेली भट्टी पाहून त्याला काय वाटलें कोणास ठाऊक, तो तसाच दारूच्या धुंदींत बाहेर जाऊन पुन्हा परत आला व मलाच सांगूं लागला कीं, मीं एक दारूची खासगी भट्टी उघडली आहे अशी आपण पोलिसला वर्दी दिली आहे! तें दारुड्याचें बरळणें खरें, पण मला भीति वाटली. मीं लगेच तयार झालेले हिरे घेतले व भट्टी विझवून टाकून बाटल्यांतील औषधें मोरींत ओतून घरांतून पोबारा केला. दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांत एक बॉंबचा कारखाना उघडकीस आल्याची बातमी माझ्या दृष्टीस पडली. पोलिसांचा शोध खोटा ठरला असेल; पण मी मात्र आपल्या घराला मुकून असा या वेषांत जवळजवळ अन्नपाण्यावांचून भटकतों आहें. रात्रींचें भटकण्याची देखील चोरी! कोठें एकाद्या जवाहिऱ्याकडे जाऊन एकादा हिरा विकावा म्हटलें तर माल दाखवतांच दुकानदार माझ्याशीं बोलण्याऐवजीं नौकराशीं कुजबुजूं लागतो. बहुतेक चोरीचा माल म्हणून पोलिसांत वर्दी जाणार या भीतीनें मी तेथून निसटतों. तात्पर्य काय कीं, खिशांत कुबेराची संपत्ति असून माझ्या पोटांत कावळे कोंकावत आहेत. कांहीं दिवसांनीं हा कोट फाटला कीं ही दौलत छपविण्यास खिसा देखील उरणार नाहीं. कोणाला सांगण्याची देखील सोय नाहीं. त्यापेक्षां प्रयोग करतांना प्रथमपासूनच तुमच्यासारख्या थोरांमोठ्यांचा आश्रय घेतला असता तर- तर काय, रागावूं नका- तर मी आजच्यासारखाच कफल्लक झालों असतों. आतां ही संपत्ति मला लाभतही आणि सोडवतही नाहीं. मग काय, घेतां कां एकदा हिरा विकत?"

इतकें बोलून तो मनुष्य उत्तराच्या अपेक्षेनें थांबला. मी कांहीं श्रीमंत नव्हतों. शंभर रुपये म्हटले तरी एका महिन्याचा पगार जावयाचा. आतां इतका अमूल्य हिरा अशा मातीमोलानें मिळत होता हें खरें; पण माझ्यासारख्यासदेखील तो उजळ माथ्यानें वापरणें अगर विकणें कठीण; शिवाय कोणी सांगावें, हा इतका प्रामाणिकपणाचा व गंभीरपणाचा आव घालतो आहे; पण हा माल चोरीचा अगर बनावट नसेलच म्हणून कशावरून? स्वतःच्या खिशाला चाट बसण्याची वेळ येतांच, त्याच्या इतक्या वर्षांच्या

परिश्रमांबद्दल व शोधाबद्दल मला वाटलेलें कौतुक नाहींसें होऊन पुन्हां माझ्या संशयानें क्षणभर कां होईना, उचल खाल्ली. त्याला काय उत्तर द्यावें याबद्दल माझा निश्चय होईना.

"हें पहा. आत्तां कांहीं मजजवळ पैसे नाहींत. तुम्ही उद्यां माझ्या ऑफिसांत या म्हणजे—"

"म्हणजे लगेच तुम्ही मला चौकीवर नेऊन गुदरणार, होय ना ? त्यापेक्षां–बरें आहे, रामराम."

इतकें बोलून तो लगेच उठला व झपझप तेथून निघून गेला. त्यानंतर मला त्याचा कांहींच पत्ता लागला नाहीं. कदाचित् तो भुकेनें अगर थंडीवाऱ्यानें गारठून मरण पावला असेल, व त्याची सगळी तपःश्चर्या, सगळी धनदौलत, त्याच्याचबरोबर कोठें तरी धुळींत मिसळून गेली असेल, किंवा एखाद्या भामट्याच्या हातीं लागली असेल ! मी जाण्यासाठीं उठलों तेव्हां आजूबाजूच्या बंगल्यांतील दिवे मालविलेले होते. माझ्या बुद्धिमत्तेच्या व परिश्रमांच्या मानानें माझी चाळीच्या खुराड्यांतील जागा फारच सुखकर व माझें आयुष्य फारच चैनींत चाललेलें आहे असें मला वाटूं लागलें.



# वट-पौर्णिमा



आ ठाचे ठोके पडले तरी वृंदावन अजून दुकानांतच बसून राहिला होता. खरें म्हटलें तर त्याची दुकानावरील नौकरी सात वाजेपर्यंतच होती. वृंदावन मोत्यांची पारख करण्यांत अत्यंत कुशल होता; इतका कीं, त्या धंद्यांत त्याचा हात धरणारा त्या गांवांत दुसरा कोणी नव्हता. मोत्यांच्या दुकानांत नौकरी करावयाचि म्हणजे अगोदर मोठी रक्कम अनामत ठेवावयास पाहिजे. वृंदावन तर बोलूनचालून दरिद्री. त्याजजवळ पैसे असते तर त्यानें स्वतंत्र दुकानच काढलें असतें. पण त्याच्या फारा दिवसांच्या ओळखीच्या एका शेठजींनीं कांहींएक अनामत रक्कम न घेतां त्याला आपल्या दुकानावर ठेवून घेतलें होतें, व तोही आपली नौकरी अत्यंत प्रामाणिकपणानें बजावीत होता. परंतु बोलूनचालून दुकानावरील नौकरी, तींत पगार किती मिळणार ? शेठजी स्वभावानें एरवीं अगदीं सज्जन, पण पैशाच्या बाबतींत कृपण. सात वर्षे नौकरी केली तरी वृंदावनाचा पगार विसाचा पंचवीस होईल तर शपथ. त्यांतून त्याचा स्वभाव दिलदार व खर्चीक असल्यामुळें त्याला अलीकडे कर्जही बरेंच झालें होतें. बरें, दिवसभर काबाडकष्ट करावे व दमूनभागून घरीं यावें तों घरीं तरी चार प्रेमळ शब्द ऐकावयास मिळतील तर तेंही नाहीं. सरोजिनी प्रेमळ तर राहोच, पण साधारण स्त्रियांप्रमाणें गरीबही नव्हती; ती अगदीं शुद्ध महामाया होती. तिचा बाप अतिशय श्रीमंत व नवरा असा दरिद्री व कर्जबाजारी. ती त्याच्याशीं कधीं एक शब्द धड बोलेल तर शपथ; उलट संधि सांपडेल त्या त्या वेळीं त्याच्या निर्धनतेबद्दल ती त्याला हवें तसें टाकून बोले. अशा स्थितींत दुकानांतून घरीं जाण्याची उत्सुकता वृंदावनाला कशी वाटावी ? आपली वेळ होऊन गेली तरी तो दुकानांतच एका खुर्चीवर रस्त्यांतील गर्दीकडे अगदीं शून्य दृष्टीनें पहात बसत असे व शेवटीं झोंपेंतून जागा करावा त्याप्रमाणें शेठजींनीं उठविल्यावर मोठ्या नाखुषीनें घरीं जात असे.

अशाच एका संध्याकाळीं वृंदावन दुकानावर बसला होता. त्या दिवशीं सकाळचें काम आटोपून तो घरीं जातो तों त्याचा सावकार घरीं येऊन बसला होता व आपल्या रकमेची फेड न केल्याबद्दल त्यानें वृंदावनाची खूप खरड काढली होती. वृंदावन आधींच कोमल मनाचा, त्यांत बायकोच्या जाचानें त्रासून गेलेला, आणि यां सर्वांवर आज त्या सावकाराच्या मर्मभेदी भाषणानें कळस चढविला. तीन दिवसांत सर्व रकमेची फेड करण्याचें वचन देऊन त्यानें सावकारास कसें तरी वाटेला लावलें. वृंदावन पानावर बसला व त्यानें जेवणाचा आविर्भाव केला. सरोजिनीही या बतावणीकडे नाटकगृहांतील एखाद्या हृदयशून्य प्रेक्षकाप्रमाणें स्वस्थ चित्तानें पहात होती. तिला वाईट वाटत होतें, नाहीं असें नाहीं; पण तें आपला पति नीट जेवीत नाहीं म्हणून नव्हे, तर आपल्या पित्याच्या घरचें सुग्रास अन्न व वृंदावनाच्या घरची जाडीभरडी मीठभाकर यांतील विरोधानें तिचें अंतःकरण व्यथित झालें होतें. पांच मिनिटांत वृंदावन पानावरून उठला व नेहमींप्रमाणें विश्रांती देखील न घेतां पुन्हा दुकानावर जाऊन बसला. त्याचें मस्तक एकसारखें भ्रमण करीत होतें. आतां त्या सावकाराचे पैसे कोठून द्यावे ? आपण तीन दिवसांत रक्कम फेडण्याचें कबूल केलें खरें; पण या अवधींत आपल्या हातून असा काय पराक्रम होणार आहे कीं, ज्या योगानें आपल्या हातीं इतके पैसे येतील ? शेठजींजवळ पैसे उसने मागितले तर? पण कर्ज कांहीं थोडेंथोडकें नव्हतें. दोनशें रुपये आपणांस शेठजी देणार तरी कोणत्या आधारावर व ते आपण फेडणार तरी केव्हां ? कर्ज फेडण्यास अगर पैसे उसने मिळण्यास वृंदावनाजवळ फक्त एकच साधन होतें, पण तें असून नसून सारखेंच होतें; कारण लौकिकदृष्ट्या जरी तें साधन वृंदावनाजवळ होतें तरी वस्तुस्थितीच्या दृष्टीनें तें वृंदावनाजवळ नसून सरोजिनीच्या हातीं होतें. तिच्या अंगावर एकदोन ठळक दागिने होते; ते विकले अगर गहाण ठेविले तर हवी तेवढी रक्कम मिळण्याजोगी होती. पण हें व्हावें कसें ? सरोजिनीजवळ दागिन्यांची गोष्ट काढणें हें मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्याइतकेंच बिकट होतें. वृंदावनाला कांहीं सुचेना. सावकार आणि कर्ज हे दोनच शब्द त्याच्या डोक्यांत सारखे थैमान करूं लागले. त्या बावरलेल्या मनःस्थितींत त्यानें एका गिऱ्हाइकाला पन्नास रुपये किंमतीच्या मोत्याची किंमत

पंचवीसच रुपये सांगून दिली व त्यामुळें शेठजी त्याजवर अतिशय संतापले. आतां आपली नौकरी जाणार असें वृंदावनाला वाटूं लागलें. पण सुदैवानें तो गृहस्थ कांहीं कामाकरितां पुन्हा दुकानांत आला, व तो सज्जन असल्यामुळें झालेली चूक त्यास कळवितांच त्यानें तें मोतीं परत करून दुसरें घेतलें. शेठजींचा राग शांत झाला व वृंदावनाची नौकरी तर बचावली; पण कर्जाची बाट काय ? नुकताच शेठजींचा मोठा अपराध केलेला, तेव्हां त्यांजजवळ पैसे मागण्याची मुळींच सोय नव्हती. तो सावकार तर नेमलेल्या वेळीं येणार.

खिन्न अंतःकरणानें वृंदावन घरीं आला. सरोजिनी दारांतच उभी होती. ती आपली वाट पहात उभी असेल काय, अशी शंका क्षणभर वृंदावनाच्या मनांत आली. पण लगेच, इतकें आपलें सद्भाग्य आहे असें आपणांस कसें वाटलें याबद्दल त्याचें त्यासच हंसू आलें. पण त्या दिवशीं त्याच्या सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवानें म्हणा, सरोजिनी खरोखरच त्याची वाट पहात होती. वृंदावन आपल्या खोलींत येऊन कपडे काढतो न काढतो इतक्यांत ती त्याच्या मागोमाग आली व भिंतीशीं टेंकून उभी राहिली.

" ऐकलं का ? मला पांच रुपये हवे आहेत."

हें काय नवीनच संकट आलें असें वाटून वृंदावन अधिकच गोंधळला. रुपये कशाला हवे आहेत म्हणून विचारण्याची सोयच नव्हती. पण मोठा धीर करून कांपऱ्या आवाजानें त्यानें तो प्रश्न विचारला, व सरोजिनीलाही कधीं नव्हे तें सरळ उत्तर देण्याची बुद्धि सुचली.

" उद्यां वट-पौर्णिमा ना ? मींच आपल्या आंगणांतल्या वडाची पूजा करायला भटजींना बोलावलं आहे. पुष्कळ दिवसांत कांहीं दानधर्म केला नाहीं—आपल्या हातून कवडी सुटेल तेव्हां ना सारं—तेव्हां म्हटलं, उद्यां या निमित्तानं तरी भटजींना जास्तकमी दक्षिणा द्यावी अन् घरच्या घरींच पूजा करावी, म्हणजे तें चार बायकांत जाणं नको नी कांहीं नको."

सरोजिनीच्या शेवटच्या वाक्यार्धाचा अर्थ वृंदावन पूर्णपणें समजला. आपल्यासारख्या यःकश्चित् दरिद्री मनुष्याला घातलेल्या माळेची व आपण तिच्या गळ्यांत बांधलेल्या मंगलसूत्राची सरोजिनीला लाज वाटते, हा त्या शब्दांचा सरळ अर्थ होता. हर हर ! जिनें आपणांस ईश्वराहूनही अधिक श्रेष्ठ माना-

वयास पाहिजे तिलाच आपल्या नांवाची देखील शरम वाटते; यापेक्षां आपण या जगांतून नाहींसे होऊन तिच्या लज्जेचें कारण दूर केल्यास काय वाईट? या सुधारलेल्या काळांत तिनें दुसऱ्या एखाद्या लायक...वृंदावनाला विचार करणेंही अशक्य झालें. एखाद्या जोराच्या प्रहारानें आपलें डोकें बधिर झाल्यासारखें त्यास वाटूं लागलें. पण लगेच पुन्हा तो भानावर आला. त्याच्या दारिद्र्याच्या कांचणीनें आज त्याच्या अंगांत एक प्रकारचा जोर उत्पन्न झाला होता व त्या जोरांत सरोजिनीला पुन्हा एकदां समजावण्याचा त्यानें यत्न केला.

"अग पण..."

"पण नाहीं नी बीण नाहीं. जेव्हां पहावं तेव्हां आपलं पण आहेच. सणावाराला नाहीं तर नाहीं, पण व्रतावैकल्याला देखील पैशाची सबब सांगणें म्हणजे काय? उगीच नाहीं देव आपणांवर कोपला तो!"

कोठून आपण बोलायला गेलों असें वृंदावनाला होऊन गेलें. आधींच ती सरोजिनीची मुलुखमैदान, त्यांतून स्वसंरक्षणार्थ तिनें देवाची ढाल पुढें केलेली; ती फोडण्याइतका धीटपणा व निष्ठुरपणा वृंदावनाचे हातून कल्पांतींही होणें शक्य नव्हतें. बिचारी सरोजिनी! आपल्यासमोर असलेल्या चालत्या-बोलत्या देवाला पायांखालीं तुडवून कोणत्या देवाचा वरद हस्त ती आपल्या मस्तकावर ओढून आणणार होती! तितक्याही उद्वेगांत वृंदावनाला तिची कींव आल्यावांचून राहिली नाहीं. चार दिवसांपूर्वींच त्याला पगार मिळाला होता, व मागील महिन्याचीं देणीं देऊन त्याजजवळ आतां नेमके पांचच रुपये शिल्लक होते. अजून जवळ जवळ सबंध महिना लोटावयाचा; पण त्याची काळजी सरोजिनीला काय? ती तर या गोष्टी ऐकून घेण्यासही तयार नव्हती. मुकाट्यानें वृंदावन उठला व पेटींतून ते पांच रुपये काढून त्यानें सरोजिनीच्या हातीं दिले. तिनेंही ते हातांत पडतांच फारसा विलंब न करतां तेथून पाय काढला.

त्या सबंध रात्रींत वृंदावनाला मुळींच झोंप आली नाहीं. उद्यांचाच दिवस मध्यें; परवां सकाळींच तो ब्रह्मराक्षस दाराशीं येऊन बसेल, त्याला कोणत्या तोंडानें नाहीं म्हणावें व तो ऐकून तरी काय म्हणून घेईल! पहांटे वृंदावनाचा किंचित् डोळा लागला, इतक्यांत सावकार दाराशीं

आला असून आपणांस मोठमोठ्यानें हांका मारीत आहे, व आपण सरोजिनीच्या दागिन्यांविषयीं मनांत आणलेला विचार ओळखूनच कीं काय, ती आपणाकडे क्रुद्ध दृष्टीनें पहात आहे असें त्यास स्वप्न पडलें व तो एकदम दचकून जागा झाला. सरोजिनी केव्हांच उठून आपल्या व्रताच्या तयारीला लागली होती. तिच्या वडिलांनीं घेऊन दिलेलें जरीचें सोंवळें नेसून ती पूजेचें साहित्य करण्यांत अगदीं गढून गेली होती. तिच्या थाटांत व्यत्यय नको म्हणून वृंदावन मुकाट्यानें उठून चहा वगैरे न घेतां लवकरच दुकानावर गेला.

इकडे सरोजिनीनें मनोभावें वडाची पूजा केली. पूजा करतांना 'जय देवा ! जन्मोजन्मीं हाच पति मिळूं दे', अशी प्रार्थना करण्याची वेळ आली. क्षणभर सरोजिनीच्या हृदयाची चलबिचल झाली. आपण प्रार्थना करणार ती मनापासून करणार आहों काय ? आपणांस खरोखरच वृंदावन जन्मोजन्मीं लाभावा असें वाटतें काय ? छे ! छे ! जन्मोजन्मीं असलें अठरा विश्वे दारिद्र्य ! या जन्मांतच आपण या ग्रहदशेला अगदीं कंटाळून गेलों आहों, मग तीच कायमची आपणांस लाभो असें मागणें देवाजवळ मागावयाचें ! उगीच ती प्रार्थना करून स्वतःशीं व देवाशीं प्रतारणा करण्यांत काय अर्थ आहे ? अशा तऱ्हेचे अनेक विचार त्या क्षणांत सरोजिनीच्या मनांत येऊन गेले. पण रूढीचा जोर का अशा क्षणिक विचारांना दाद देणार ? तिकडे भटजी फोनोग्राफप्रमाणें भराभर पूजा सांगत होते व इकडे सरोजिनीनेंही एखाद्या यंत्राप्रमाणें, 'जय देवा, ही प्रार्थना सफल होऊं देऊं नकोस', असें मनांत म्हणत म्हणतच 'जन्मोजन्मीं हाच पति लाभूं दे', अशी प्रार्थना केली व तो पूजेचा समारंभ आटोपला.

पण त्या क्षणापासून सरोजिनीच्या मनाची शांतता नाहींशी झाली. 'हाच पति जन्मोजन्मीं लाभूं दे' हें वाक्य तिच्या डोक्यांत एकसारखें घोळूं लागलें. तिनें तो विचार आपल्या मनांतून घालवून देण्याचा शक्य तितका यत्न केला, पण तिच्या इच्छेविरुद्ध तें वाक्य तिच्या मनश्चक्षूंसमोर नाचूं लागलें. तिला कांहींएक सुचेना. सभोंवतालच्या सगळ्या भिंतींवर ती प्रार्थना ठळक अक्षरांनीं लिहिलेली तिला दिसूं लागली. तिनें

मोठ्यानें ओरडून म्हणत आहे असें तिला वाटूं लागलें. आपण वटदेवतेचा कांहींतरी मोठा अपराध केला असून तिनें त्याबद्दल हें भूत आपणामागें लावून दिलें आहे कीं काय असा सरोजिनीस संशय आला, व तिनें भटजींना बोलावून आणून, वडाच्या पूजेंत कांहीं चूक तर झाली नाहीं ना, म्हणून विचारलें. भरपूर दक्षिणा मिळाल्यामुळें भटजीबोवा अगदीं खूष होऊन गेले होते. ते एकदम, 'छे ! छे ! बाईसाहेब, चूक कशी होईल ? उलट इतकें यथासांग व्रत झालेलें इतक्या वर्षांत मी प्रथमच पहातों आहे', असें म्हणून मोठ्यानें हंसले व लगेच दुसरीकडे पूजेला जाण्याची गडबड आहे असें म्हणून निघून गेले.

तरी सरोजिनीचें समाधान होईना. सर्व व्रत तर यथासांग झालें, मग ती प्रार्थना अजून आपला पिच्छा कां सोडीत नाहीं ? ती आपण मनापासून केली नाहीं हें खरें. पण त्यास आपला काय इलाज ? पुन्हा एकदां मनोभावानें ती करतां येते का पहावें म्हणून तिनें आपले डोळे मिटले, तों त्या निर्दय सावकाराचें व त्याच्यापुढें खालीं मान घालून बसलेल्या दीनवाण्या वृंदावनाचें चित्र तिला दिसूं लागलें. ती शिळी भाकर, तो सावकार, तें कर्ज, ते हाल-'जयदेवा ! ही प्रार्थना खरी होऊं देऊं नकोस', हें वाक्यच तिच्या इच्छेविरुद्ध पुन्हा तिच्या मनानें उच्चारलें.

संध्याकाळीं सरोजिनी वटसावित्रीची कथा ऐकण्यास गेली. पुराणिकबोवा नाणावलेले असून ते ती कथा अत्यंत रसाळ भाषेंत सांगत होते. यम-सावित्रीचा संवाद ऐकतांना सर्व स्त्रियांचे डोळे पाण्यानें भरून आले. “ सावित्री ! ” यम म्हणाला, “ तूं दुसरा कोणताही वर माग; सर्व त्रिभुवनाचें ऐश्वर्य माग, तें मी तुला देतों; पण सत्यवानाच्या प्राणांची भिक्षा तेवढी मागूं नकोस.” “यमराज !” सावित्रीनें उत्तर केलें, “ माझे पंचप्राण आपण हिरावून घेतल्यावर या निर्जीव देहाला त्रिभुवनाचें ऐश्वर्य काय होय ? प्रेताला दगड आणि सिंहासन हीं दोन्ही सारखींच. माझे पति हेंच माझें ऐश्वर्य आणि त्यांचें हृदय हेंच माझें त्रिभुवन.” अखेर त्या वादांत यमानें हार खाल्ली व सावित्रीचा विजय झाला. श्रोतृजनांच्या दुःखाश्रूंचें आनंदाश्रूंत रूपांतर झालें. “ पातिव्रत्याचा प्रभाव काय वर्णावा ! ” पुराणिकबोवा

पुढें सांगूं लागले. "प्रत्यक्ष आपल्या पतीचे प्राण देखील त्या सतीनें आपल्या पातिव्रत्याच्या जोरावर परत मिळविले, मग इतर सुखांची काय कथा!"

सरोजिनी लक्षपूर्वक ऐकत होती. पुराणिकबोवांच्या सांगण्यांतून तरी आपली चूक आपल्याला कदाचित् कळून येईल या आशेनें त्यांचा प्रत्येक शब्द ती आपल्या हृदयांत सांठवीत होती. त्यांचें हें शेवटलें वाक्य ऐकतांच तिच्या डोक्यांत एक नवीनच प्रकाश पडला व त्या प्रकाशांत ती आत्म-निरीक्षण करूं लागली. 'पातिव्रत्याच्या जोरावर प्रत्यक्ष प्राणदेखील परत मिळविले, मग इतर सुखांची कथा काय'! खरोखरच पातिव्रत्याचा प्रभाव इतका आहे काय? त्याच्या जोरावर सर्व सुखें हस्तगत होतात हें खरें काय? हो, असलेंच पाहिजे; यांत शंका कसली? प्रत्यक्ष पुराणिकबोवा सांगताहेत, व तीही कांहीं कल्पित कथा नव्हे, तर प्रत्यक्ष घडलेली गोष्ट. या विचारानें सरोजिनीच्या हृदयांत आतां ठाणें दिलें. घरीं परत येत असतां पुराणिक-बोवांचें तें वाक्य ती आपल्या मनांत गुणगुणत होती.

सरोजिनी घरीं आली तों नुकतेच दिवे लागले होते. अजून वृंदावना-ची घरीं येण्याची वेळ झाली नव्हती; पण त्याच्या खोलींत दिवा लावण्या-साठीं ती आंत जाते तों वृंदावन आंत निजलेला. त्याचें सर्वांग तापानें फणफणलें होतें; ताप इतका वाढला होता कीं, त्याची शुद्ध जाऊन तो मधून मधून बडबडत होता. "आतां मात्र खचित दोन दिवसांत तुमचे सर्व पैसे देतों. नका! नका! माझ्या लाडक्या सरोजिनीच्या दागिन्यांना हात लावूं नका! तिला छळूं नका हो!" अशीं वाक्यें अस्पष्ट स्वरांत त्याच्या तोंडून निघत होतीं. त्या वाक्यांनीं सरोजिनीच्या हृदयाचें पाणी करून टाकलें. थोड्याच वेळांत वृंदावन बोलेनासा झाला. त्याला गुंगी आली असावी.

पातिव्रत्याचा प्रभाव पहाण्याची वेळ सरोजिनीवर आतांच येऊन ठेपली. वृंदावनाला लवकर आराम पडण्याविषयीं तिनें देवाची मनोभावानें प्रार्थना केली. पण आपली प्रार्थना सफल होईल का, अशी शंका लगेच तिच्या मनांत आली. आपण खरोखर पतिव्रता आहों काय? यमानें हात टेंकले खरे, पण ते सावित्रीपुढें! आपणास सावित्री होतां येईल का? वृंदावना-चा ताप घालविण्याइतकी पुण्याई तरी आपल्या पदरीं आहे काय? आजपर्यंत कधीं त्याची सेवा तर राहोच, पण फुकाचा एक गोड शब्दही आपण

त्याच्याशीं बोललों नाहीं. तो आपणांस क्षमा करील काय ? होय, खचित करील. बेशुद्धींत देखील जो आपली इतकी काळजी वहातो, तो आपल्या पश्चात्तापाच्या अश्रूंनीं द्रवणार नाहीं असें कधींही होणार नाहीं. आपल्या यत्किंचित् दागिन्यांसाठीं वृंदावनाची इतकी तळमळ ! त्याचें कांहीं बरें-वाईट झाल्यास ते दागिने आपणांस शोभा आणतील काय ? वृंदावन आणि दागिने यांत श्रेष्ठ कोण हें सरोजिनीला आतां उमजलें. ती त्याच्या उशाशीं बसून अश्रू गाळूं लागली.

बऱ्याच वेळानें वृंदावन जागा झाला. सरोजिनीनें त्याचें डोकें आपल्या मांडीवर घेतलें व हातानें त्याचें कपाळ चेपीत सर्व लज्जा बाजूस सारून त्याला हांक मारली.

" नाथ ! "

" कोण तें ? सरोजिनी ? "

" होय, मीच ती आपली सरोजिनी. आतां कसं वाटतं आहे आपणाला ? "

" सरोजिनी, तूं अजून जागी कशी ? "

हा प्रश्न वृंदावनानें अगदीं सहज, अर्धवट झोंपेंतच विचारला होता; पण त्यानें सरोजिनीच्या हृदयाला चरका बसला. आपल्या आजपर्यंतच्या वर्तनाचें सगळें सार त्या प्रश्नांत भरलेलें आहे असें सरोजिनीस वाटलें. वृंदावनाचा प्रश्न अगदीं स्वाभाविकच होता; पण त्याच्या दुःखाची कदर न करणारी ती सरोजिनी पश्चात्तापाच्या अग्नींत दग्ध होऊन गेली असून त्या अग्नींतून शुद्ध होऊन बाहेर पडलेली नवीन सरोजिनी आतां वृंदावनाजवळ बसली आहे हें त्यास कोणत्या शब्दांनीं सांगावें हें तिला कळेना. किंचित् गोंधळून ती म्हणाली, " हें काय बरं विचारणं ? आपणांला थोडा ताप आला आहे ना ? म्हणून मी जवळ बसलें आहें. थोडं दूध आणूं का ? "

" अहाहा ! कोण बोलतें आहे हें ? सरोजिनीच का ? " वृंदावनाला आपण जागे आहों कीं स्वप्नांत आहों हेंच कळेना. सरोजिनीच्या शब्दांत कांहीं अद्भुत जादू भरली आहे असें त्यास वाटलें. असा अनुभव त्याला आजपर्यंत कधींही आला नव्हता. त्याच्या हृदयावर ठेवलेल्या आपल्या कोमल हातानें सरोजिनी त्याच्या अंगांत एक नवीन चैतन्य ओतीत होती. वृंदावन आनंदसागरांत पोहूं लागला. पतिव्रतेची कोमल वाणी अमृताहूनही अधिक

प्रभावशाली असते याचें प्रत्यंतर सरोजिनीस मिळालें. तितक्या तापांतही वृंदावनाच्या चेहेऱ्यावर स्मित चमकूं लागलें; पण पुन्हा सावकाराची आठवण होऊन तो अस्वस्थ झाला सरोजिनीनें तें ओळखलें, व जी गोष्ट ती थोड्याच वेळांत करणार होती ती केलीच आहे असें वृंदावनाच्या स्वास्थ्यासाठीं त्याला सांगण्यांत कांहीं पाप नाहीं असें समजून अत्यंत मृदु शब्दांत ती त्याला म्हणाली,

"ऐकलं कां? त्या सावकाराचं देणं फिटलं."

"काय? देणं फिटलं? कोणीं फेडलं?" आश्चर्यचकित मुद्रेनें वृंदावनानें विचारलें. आपण स्वप्नांत आहों हाच संशय त्याच्या मनांत दृढ होऊं लागला. पण सरोजिनीनें तें स्वप्न नसून वस्तुस्थिति असल्याबद्दल त्याची खात्री करून दिली.

"कोणीं फेडलं म्हणजे? मीं फेडलं. मजजवळ होते दोनशें रुपये. मला वडिलांनीं अडीअडचणीला म्हणून मागल्या खेपेला दिले होते. आतां आपली अडचण होती ना? या वेळीं ते कारणीं लावले. आतांच त्याच्याकडे सगळी रक्कम रवाना केली. म्हणजे तो मेला पुन्हा आपल्या घरीं यायलाच नको."

दुसऱ्या दिवशीं वृंदावन खडखडीत बरा झाला. तापामुळें त्याचें शरीर जरी थकलें होतें, तरी रोजच्यापेक्षां अधिक उल्हासानें तो दुकानावर गेला. त्याला आतां एकच काळजी होती, व ती म्हणजे आपल्या लाडक्या सरोजिनीनें केलेल्या स्वार्थत्यागाची सव्याज फेड कशी करावी ही होय. दुकानावर जातांच शेठजींच्या बायकोनें आपणांस बोलाविलें असल्याचें वृंदावनास समजलें. तिनेंही वट-पौर्णिमेचें व्रत यंदां मोठ्या थाटानें केलें असून तत्प्रीत्यर्थ एकाद्या सत्पात्र ब्राह्मणाला चांगलें दान करण्याचें ठरविलें होतें. तें करण्यास वृंदावनाइतका लायक ब्राह्मण तिला दिसेना. वृंदावनाचा इमानीपणा, शेठजींच्या कुटुंबांतील सर्व माणसांशीं त्याचें अत्यंत विनयशील व प्रेमळ असें वर्तन, यांचे योगानें तो तिला अत्यंत प्रिय झाला होता. आदले दिवशीं संध्याकाळींच तिनें त्याला बोलावणें पाठविलें होतें; पण तो घरीं निघून गेला होता. दुसरे दिवशीं सकाळीं वृंदावनाला निरोप कळतांच तो तिजकडे येऊन हजर झाला. तिनें त्याला मोठ्या अगत्यानें बसवून घेतलें व

आपल्या पेटींतून एक मोत्याची बहुमोल माळ काढून ती त्याला नजर केली. कालपासून आपणांस लाभत असलेली ही सुखपरंपरा पाहून वृंदावन अगदीं भांबावून गेला. शेठजींच्या बायकोचे उपकार कोणत्या शब्दांनीं मानावे हेंच त्याला कळेना. ती माळ देण्याचें प्रयोजन तिनें त्याला सांगितलें तेव्हां सरोजिनीच्या वर्तनांतील फरकही वट-देवतेनेंच घडवून आणला असेल काय, अशी त्याला शंका येऊं लागली. तो घरीं परत आला तों सरोजिनी एक माळ जपीत बसली होती.

"सरोजिनी, काय करते आहेस ?"

"पुढच्या वर्षींच्या वट-पौर्णिमेस किती दिवस राहिले हें मोजतें आहें."

"त्या माळेनें नको मोजूस, या माळेनें मोज," असें म्हणून वृंदावनानें ती माळ सरोजिनीच्या गळ्यांत घातली.

"हें काय ?"

"हा वट-देवतेचा प्रसाद !"



# गुंडोपंत आणि गुरुत्त्वाकर्षण




डोपंतांची अलीकडे अगदीं शोचनीय स्थिति झाली होती. दिवसेंदिवस त्यांच्या वयाबरोबरच त्यांचें वजनही एकसारखें वाढत चाललें होतें. त्यांनीं निरनिराळे उपास करून पाहिले, निरशनाचें खाऊन पाहिलें, धान्यफराळ करून पाहिलें, व शेवटीं अगदीं खरमरीत लंघन-चिकित्साही करून पाहिली, पण त्यांच्या शरीराचा आकार यत्किंचितही कमी होण्याचें चिन्ह दिसेना; उलट तो शुक्ल पक्षांतील चंद्राप्रमाणें, शिमग्यांतील कवित्वाप्रमाणें, पुण्याच्या रस्त्यांवरील धुळीप्रमाणें, अगर सरकारी साऱ्याप्रमाणें एकसारखा वाढतच चालला. यानंतर गुंडोपंतांनीं एकाच वेळीं वरीलपैकीं दोन दोन उपचार करून पाहिले; उदाहरणार्थ, दूध व धान्यफराळ, व त्यानंतर दोन तीन तास लंघन-मीमांसा, इत्यादि. एकादशीच्या घरीं शिवरात्र जावी, त्याप्रमाणें गुंडोपंतांनीं एकादशीचे व शिवरात्रीचे, दोन्हीं तऱ्हेचे पदार्थ एकाच बैठकीला खाऊन पाहिले, पण गुणाच्या नांवानें भोंपळा! गुंडोपंतांना स्वतःचेंच वजन असह्य होऊन ते त्याच्या भारानें वाकूं लागले, व आपण बोलण्याचालण्यापैकीं बोलण्यांत फटकळ, परंतु चालण्यांत अत्यंत विनयशील असल्याबद्दल प्रौढी मिरवूं लागले. शरीराच्या वजनांत केंसांची भर नको म्हणून त्यांनीं आपल्या दाढीमिशांना रजा दिली. शेवटच्या गवताच्या काडीनेंच उंटाचा प्राण जातो, ही इंग्रजींतील म्हण त्यांना पटली असावी. त्यांनीं निरनिराळ्या डॉक्टर-वैद्यांना आपलें शरीर दाखविलें; परंतु त्यांच्या औषधांनीं गुंडोपंत कृश होण्याऐवजीं त्या औषधांचा त्यांना टॉनिक-प्रमाणेंच उपयोग—म्हणजे अपाय—होऊं लागला! एक दिवस जिवाला कंटाळून त्यांनीं पावशेर अफू खाल्ली, पण तिचा इष्ट परिणाम न होतां त्यांचें वजन मात्र पावशेरानें वाढलें. याच प्रमाणांत गुंडोपंतांचें वजन वाढत

गेल्यास त्यांस आपली दुसऱ्या मजल्यावरील जागा खाली करावी लागेल, नाहीं तर त्यांच्या वजनानें ती आपोआपच खाली होईल, अशी घरमालकानें त्यांना नोटीस दिली. गुंडोपंतांनीं अखेर मुंबईच्या एखाद्या नामांकित डॉक्टरचा सल्ला घेण्याचें ठरविलें. परंतु खंडाळ्यास लावावीं लागणारीं दोन एंजिनें पुण्यापासूनच जोडावीं लागतील या भीतीनें त्यांना मुंबईचा 'पासपोर्ट' देण्यांत आला नाहीं. गुंडोपंतांनीं लगेच आपल्या तक्रारीला राजकीय स्वरूप देऊन आपल्या व्यक्तिस्वातंत्र्यावर आलेल्या या घाल्याबद्दल सबंध देशभर दौरा काढून प्रचंड चळवळ केली, व शेवटीं आपण राष्ट्रीय सभेत याबद्दल निषेधपर ठराव आणूं अशी कंपनीसरकारास धमकी दिली. त्याबरोबर सर्कशींतील श्वापदें नेणाऱ्या एका वॅगनमधून त्यांना मुंबईस रवाना करण्यांत आलें. त्यांच्या डब्याभोंवतालचे ते मजबूत गज पाहून स्टेशनावरील लोकांस असें वाटावें कीं, जणुं कांहीं चळवळ केल्याबद्दल या पुरुषसिंहास कैद करूनच चालविलें आहे ! असो. मुंबईस पुष्कळ मोठमोठे डॉक्टर वैद्य होते, पण बहुतेकांचे दवाखाने उंच उंच मजल्यावर. गुंडोपंतांस माडीवरून खालीं अगदीं सहज, लीलेनें, त्यांना पाहिजे त्यापेक्षां देखील त्वरित गतीनें येतां येई, व स्वतः गुंडोपंतांना जरी आपल्या या लीलेविषयीं विशेष अभिमान-वर दिलेल्या त्यांच्या विनयशील स्वभावमुळें—वाटत नसला तरी आजूबाजूच्या पोरांना तीबद्दल त्यांचें फार कौतुक वाटे. पण माडीवर जावें कसें ? कोणी लिफ्टवाला तर त्यांना वर नेण्यास तयार होईना. 'लिफ्ट मोडली आहे', असें प्रत्येक जण अस्फुट व घाबरलेल्या स्वरांत सांगे. खरें म्हटलें तर ही व्याकरणाची चूक होती; कारण 'लिफ्ट मोडेल', असें त्यानें म्हणावयास पाहिजे होतें; पण गुंडोपंतांचें भूत दृष्टीस पडतांच त्याच्या तोंडांतील भविष्य-काळाचा तोंडांतल्या तोंडांतच भूतकाळ होऊन जात असावा. गुंडोपंतांना व्याकरणाचें ज्ञान इतर विषयांच्या मानानें अंमळ कमी असल्यामुळें त्यांच्याही लक्षांत ही चूक येत नसे. अखेर रासायनिक द्रव्यांचा शोध लावणाऱ्या व तळमजल्यावर राहणाऱ्या एका होतकरू डॉक्टरकडे गुंडोपंतांनीं धांव घेतली. गुंडोपंत आणि धांवणें यांचा हा संबंध वास्तविक नसून लाक्षणिक आहे हें सांगणें नकोच. डॉक्टर पतंगे नुकतेंच आपण तयार केलेल्या एका औषधाचा प्रयोग घोड्यावर करून पहाण्याच्या विचारांत होते. घोड्याऐवजीं हत्ती

मिळालेला पाहून त्यांस फार आनंद झाला. त्यांनीं स्थूल पदार्थ सूक्ष्म प्रमाणांत दर्शविणाऱ्या एका दुर्बिणींतून गुंडोपंतांचें सर्व शरीर एकाच नजरेंत पाहिलें. गुंडोपंतांचा क्ष-किरणांनीं फोटो घेण्याचें त्यांनीं ठरविलें, पण गुंडोपंतांस कितीही दूर उभें केलें तरी कांचेवर त्यांच्या पोटापेक्षां अधिक भागाचें चित्र मावेल तर शपथ. डॉक्टरसाहेबांनीं तो नाद सोडून दिला, व केलेल्या परीक्षेवरूनच गुंडोपंतांना एक औंसभर औषध देऊन तें रात्रीं निजते वेळीं घेण्यास सांगितलें. गुंडोपंत संशयित मुद्रेनें त्या औषधाकडे व डॉक्टर पतंगे यांजकडे आळीपाळीनें पाहूं लागले. पहिल्यापहिल्यानें गुंडोपंत कोणतेंही औषध घेण्यास एका पायावर तयार असत. परंतु त्या औषधांचा कांहींएक उपयोग न झाल्यामुळें, व अलीकडे गुंडोपंतांना एका पायावर आपल्या गुरुत्वाकर्षणाचा मध्य बिंदु सांभाळतां येत नसल्यामुळें ते कोणत्याही डॉक्टर-कडे जरा जड पावलांनींच जात. औषधाचा उपयोग झाला तर ठीक, नाहीं तर फुकट—नव्हे विकत—एक औंसभर वजन मात्र वाढावयाचें, असें गुंडोपंतांस वाटूं लागलें; परंतु त्या औषधाचा गुण खचित येईल असें डॉक्टर पतंगे यांनीं गुंडोपंतांच्या गळ्याचीच नव्हे तर सर्व शरीराची शपथ घेऊन सांगितलें. गुंडोपंतांची शपथेवर फार श्रद्धा. औषधानें नाहीं, तर डॉक्टर-साहेबांच्या शपथ-भंगानें तरी आपलें शरीर झडून जाईल अशी गुंडोपंतांस खात्री वाटून त्यांनीं तें औषध घेण्याचें ठरविलें व ते घरीं गेले.

ठरल्याप्रमाणें रात्रीं गुंडोपंतांनीं तें औषध घेतलें. आतां आपलें वजन व व्यास थोडीं तरी कमी होतील व आपणांस चार माणसांत चटकन् बसतां उठतां येईल, आपण रस्त्यानें चाललों असतां आजूबाजूंच्या घरांतील बायका आपल्या रडक्या मुलांस भीति दाखविण्यासाठीं घेऊन दारांत येईनाशा होतील, टवाळ पोरांनीं अंगावर कुत्रे सोडल्यास आपणांस निदान खूप जोरांत धूम तरी ठोकतां येईल, इत्यादि अनेक सुखमय विचार संध्याकाळपासूनच गुंडोपंतांच्या डोक्यांत घोळत होते. औषध घेतल्याबरोबर गुंडोपंत गाढ झोंपीं गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उजाडून गेलें तरी गुंडोपंत उठेनात. त्यांची मोलकरीण केर काढण्यासाठीं खोलींत आली, तों गुंडोपंत आपल्या बिछान्यावरही नव्हते ! यंडीनें कुडकुडत ते आपल्या खोलीच्या पटईला

चिकटून बसले होते ! डॉक्टर पतंगे यांच्या रामबाण औषधामुळें त्यांचें वजन हवेपेक्षांही कमी होऊन त्यांचेवर गुरुत्त्वाकर्षणाची मात्रा चालेनाशी झाली, व त्यांचा जमिनीचा आधार सुटून ते एखाद्या फुग्याप्रमाणें वर तरंगूं लागले ! क्षणभर आपण संध्याकाळच्या कल्पनातरंगांत पोहत आहों कीं खरोखरच हवेंत तरंगत आहों हेंच गुंडोपंतास उमजेना. मोलकरीण तर बिचारी 'भूत ! भूत !' असें ओरडत बाहेर पळून गेली. आतां काय करावें ? गुंडोपंतांची अगदीं पांचावर धारण बसली. आतां कसलें बसणें उठणें आणि कसलें धूम ठोकणें ! जमिनीला पाय लागतील तर बसण्याची आणि धांवण्याची गोष्ट. कोठून हा उपद्याप केला असें गुंडोपंतांस होऊन गेलें. त्यांनीं जमिनीवर उडी मारण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ. येशू ख्रिस्ताप्रमाणें खांबाला ठोकून टाकल्यासारखे ते तुळईला खिळून बसले होते. आपण साक्रेटीस, गॅलिलिओ यांच्याप्रमाणें शास्त्रशुद्ध सत्यान्वेषणासाठीं आत्मयज्ञ केलेले महापुरुष आहों, असें गुंडोपंतांस वाटूं लागलें, पण दुपारचे बारा वाजतांच पोटांतील कावळ्यांच्या किलबिलाटामुळें हे तात्त्विक समाधानाचे शब्द त्यांचे त्यांसच ऐकूं येईनासे झाले. त्यांचें हृदयच नव्हे, तर सर्व शरीर दुःखावेगानें उचंबळूं लागलें; ही पटई मध्यें आड नसती तर आपण केव्हांच वर उडत जाऊन चंद्रलोकावर पोहोंचलों असतों व चंद्रावर वस्ती नाहीं हें विधान खोटें ठरवून आणखी एका शास्त्रीय शोधाचें श्रेय घेतलें असतें, याविषयीं गुंडोपंतांस मुळींच संशय उरला नाहीं. त्यांस आपलें शरीर पतंगाप्रमाणें व मन इंद्रजवाप्रमाणें भासूं लागलें. आतां काय, झाली गोष्ट होऊन गेली. गुंडोपंतांचा जीव भुकेनें अगदीं व्याकुळ होऊन गेला होता; पण त्यांच्या खोलींत येण्यासच कोणी धजेना, मग त्यांना खायला प्यायला देण्याची गोष्ट दूरच राहिली. दुपारीं जेवणखाण आटोपल्यावर आपल्या औषधाचा प्रभाव पाहण्यासाठीं डॉक्टर पतंगे गुंडोपंतांकडे आले, तों आपला प्रयोग इतका कल्पनेबाहेर यशस्वी झालेला पाहून त्यांनीं आनंदातिशयानें उंच उडी मारली व क्षणभर गुंडोपंतांशीं हस्तांदोलन केलें. त्यांच्या हातानें आपण खालीं ओढले जाऊं अशी गुंडोपंतांस मोठी आशा वाटून त्यांनीं डॉक्टरसाहेबांचा हात घट्ट धरला व त्यामुळें डॉक्टरसाहेब क्षणभर त्रिशंकूप्रमाणें लोंबकळले; पण

त्यांना तुळईचें हें उलटें गुरुत्त्वाकर्षण असह्य होऊन त्यांनीं आपला हात जोरानें हिसकला, व त्यामुळें डॉक्टरसाहेब जमिनीवर, व त्यांचे रोगी—पूर्वीं निरोगी व औषध घेतल्यामुळें रोगी—वर तुळईवर, सारख्याच वेगानें आपटले. गुंडोपंतांनीं आश्चर्य, भीति, कृतज्ञता, इत्यादि मिश्रित मुद्रेनें डॉक्टर पतंगे यांजकडे पाहिलें, व आपणांस भूक लागली आहे अशा अर्थाची खूण केली. गुंडोपंतांप्रमाणेंच भुकेखेरीज बाकी सर्व विकार डॉक्टरसाहेबांच्या चेहेऱ्यावरही दिसूं लागले. डॉक्टरसाहेबांनीं एकावर एक दोनतीन टेबलें रचलीं व त्यांना शिडी लावून गुंडोपंतांचा हात पोहोंचेल इतक्या उंचीवर चहा व फराळाचें सामान ठेवविलें. गुंडोपंत आधाशाप्रमाणें चहा पिऊं लागले, पण तो त्यांच्या पोटांत न जातां त्यांच्या तोंडांतून कारंजाप्रमाणें वर उडूं लागला! त्यालाही त्यांच्या पोटांतील औषधाची बाधा झाली! पटईचीं लांकडें गुंडोपंतांस बोंचूं नयेत म्हणून डॉक्टरसाहेबांनीं एकदोन मजुरांच्या साहाय्यानें त्यांस मोठ्या प्रयासानें थोडें खालीं दाबलें, व त्यांच्या व पटईच्या मध्यें एक गादी सरकावून दिली. अशा रीतीनें गुंडोपंतांच्या आयुष्याची एकदम अक्षरशः उलटापालट होऊन गेली! धर्मराज एकदांच खोटें बोलल्याबद्दल त्याचा रथ जमिनीवरून चालूं लागला; आपण तर जन्मभर खोटें बोलत आलों, मग आपणांस जमिनीवरून कां चालतां येऊं नये हें गुंडोपंतांस कळेना. खरें बोलून तरी आपले पाय जमिनीला लागतात कां पहावें म्हणून त्यांनीं त्रिकालाबाधित सत्य असे युक्लिडचे सिद्धान्त मोठमोठ्यानें ओरडून म्हणण्यास सुरवात केली. पण त्यामुळें ते खालीं न उतरतां आजूबाजूचीं मंडळी मात्र अधिकच भिऊन त्यांच्या खोलींत येईनाशीं झालीं. गुंडोपंतांस त्या खोलींत आढ्याला लोंबकळत राहण्याचा अगदीं कंटाळा येऊन गेला. विहिरींत उडी टाकून जीव देऊं म्हटलें तर तेवढेंही सुदैव त्यांच्या वांट्याला राहिलें नव्हतें. पटईखालूनच इकडे तिकडे सरकून थोडा व्यायाम घ्यावा म्हणून ते फुलपांखराप्रमाणें वरच्यावर प्रदक्षिणा घालूं लागले व फुलपांखराप्रमाणेंच पटईला लागलेल्या कोळिष्टकांनीं गुरफटून गेले. तसेंच सरकून बाहेर पडावें तर कोठें जाऊं याचा पत्ता नाहीं व परत येण्याची तर मुळींच आशा नाहीं. अशा रीतीनें गुंडोपंत मनुष्य-जन्मांतच पक्ष्यांच्या आयुष्यांतलि सुख-दुःखें, नव्हे नुसतींच दुःखें, अनुभवीत असतां, व पृथ्वी-

च्या पाठीवरील सर्व प्राण्यांचा हेवा करीत, आपणांस त्या पाठीवरून पुन्हा कधीं वावरतां येईल काय अशी आशा करीत काळ कंठीत असतां, एक दिवस त्यांच्या एका मित्रास एक युक्ति सुचली. तो एका पेटींत कायसें घेऊन गुंडोपंतांकडे आला. त्यानें मोठया मुष्किलीनें गुंडोपंतांचे पहिले कपडे काढले, व त्या पेटींतील कपडे त्यांच्या अंगावर चढवून त्यांवर पुन्हा त्यांचे पहिले कपडे घालून दिले. झालें. गुंडोपंत एकदम जमिनीवर आपटले व लगेच ताडकन उठून ते आनंदानें खोलीभर नाचूं लागले. ते चालू लागल्याबरोबर त्यांचे सर्व व्यवहारही पूर्वींप्रमाणें चालू झाले. त्यांच्या मित्रानें शिशाच्या पत्र्याचे कपडे तयार करवून त्यांच्या अंगांत घातल्यामुळें त्यांचें वजन हवेपेक्षां अधिक होऊन ते पुन्हा गुरुत्त्वाकर्षणाच्या आटोक्यांत आले, व त्या कपडयांवरून आपले नेहमींचे कपडे असल्यामुळें कोणाच्याही न कळत मोठ्या दिमाखानें रस्त्यांवरून कांहीं काम नसतां मुद्दाम भटकूं लागले. ज्या सर्कशीबरोबर ते प्रथम मुंबईस आले होते त्या सर्कशीला शोभण्यासारखाच हा जमिनीवरून चालण्याचा प्रकार आहे असें त्यांस वाटूं लागलें, इतका त्यांस आपल्या कौशल्याबद्दल अभिमान वाटूं लागला. त्यांची पूर्वींची विनयशील वृत्ति तर गेलीच, परंतु गुंडोपंतांचा स्वभाव अलीकडे फारच तापट झाला आहे असें सर्व जण म्हणूं लागले, कारण ते अलीकडे कोणासही आपल्या अंगाला हात लावूं देत नसत, इतकेंच नव्हे, तर आपल्या स्वतःच्या मुलाबाळांना देखील अंगाखांद्यांवर घेत नसत !



# कोण ?



फार प्राचीन काळीं दैवनगरीमध्यें भगदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. तो राजा आणि त्याची ती नगरी हीं दोन्हीं त्याच्या नांवांना साजतील अशींच होतीं; इतकीं कीं, जणुं कांहीं ज्या भगदत्त राजाच्या मातापितरांनीं त्याचें नांव ठेविलें आणि ज्या त्यांच्याही आधींच्या लोकांनीं त्या नगरीचें नामकरण केलें त्या लोकांना भगदत्ताचें व त्याच्या ताब्यांतील नगरीचें भवितव्य अगोदरच माहीत असावें ! तीं नांवें इतकीं सार्थ होतीं असें आम्ही म्हणतों याला कारणही तसेंच बलवत्तर आहे. कारण त्या राज्याची व्यवस्था—अगर अव्यवस्था—तशीच कांहीं दैवाधीन होती. राजा भगदत्त मोठा श्रद्धाळू, पण त्याची श्रद्धा दैवावर असे. त्याच्या या श्रद्धास्थानांतील एका अधिक मात्रेच्या बेरजेमुळें त्याच्या नगरींतील प्रजेच्या सौख्यांत आणि सुरक्षिततेंत किती वजाबाकी होत होती याची राजा भगदत्तास मुळींच कल्पना नव्हती ! कोणत्याही आरोपीला उघड अगर संशयावरून पकडल्यास, त्याची चौकशी भगदत्त मानवी बुद्धीला गोचर अशा साक्षीपुराव्यावरून करीत नसे, तर आरोपीच्या अपराधाचा अगर निर्दोषित्वाचा न्यायनिवाडा ज्याच्या त्याच्या नशिबाकडून करविला जात असे. या चमत्कृतिजनक न्यायदानाच्या व्यवस्थेसाठीं दैवनगरीमध्यें एक भव्य न्यायमंदिर बांधलेलें होतें. त्या मंदिराच्या मध्यभागीं मजबूत कठड्यानें वेष्टित असा एक चौथरा असून, त्या चौथऱ्याच्या खालीं दोन तळघरें असत व त्या तळघरांचीं द्वारें चौथऱ्याच्या जमिनींत बसविलेलीं असत. एका तळघरांत अत्यंत भयंकर असा एक व्याघ्र व दुसऱ्यांत एक तितकीच स्वरूपसुंदर बालिका लपविलेली असे. कोणत्या तळघरांत कोण आहे हें कळण्यास मात्र कोणासही मार्ग नसे. कारण या रहस्यांतच आरोपींची दैवपरीक्षा असे. अशा त्या चौथऱ्यावर आरोपीस आणून सोडण्यांत येई, व त्या दोन तळघरांपैकीं कोणत्या तरी

एकाचें द्वार उघडण्याची त्यास आज्ञा होई. आरोपीच्या आयुष्याची दोरी बळकट व त्याच्या सुखाची बाकी त्याच्या नशिबानें शिल्लक असली, तर त्यास ती बालिका असलेलें तळघर उघडण्याची बुद्धि होई, व त्यावरूनच तो पूर्णपणें निरपराधी आहे असा निकाल होऊन त्याचा त्या सौंदर्यलतिकेशीं तेथल्या तेथें, त्याची मर्जी असो वा नसो, विवाह करून देण्यांत येई. परंतु जर का आरोपीच्या दैवानें त्यास दगा दिला तर तो अपराधी ठरून त्याच्या अपराधाचें शासनपत्रही तत्क्षणींच त्या व्याघ्राच्या नखांनीं त्याच्या हृत्पटलावर कोरलें जाई.

अशा रीतीनें राजा भगदत्त आपल्या दैवनगरींतील आरोपींचा न्यायनिवाडा मोठ्या दक्षतेनें व प्रामाणिकपणें करीत असे. त्याची ती न्यायपद्धति विलक्षण तर खरीच; पण तींतही नेहमीं हटकून अन्यायच होईल अशी कोणालाही खात्री देतां आली नसती. मानवी न्यायाधिशांच्या हातून तरी नेहमीं न्यायच मिळतो असें कोठें आहे ? कोणाच्या प्रामाणिक गैरसमजामुळें तर कोणाच्या अप्रामाणिक समंजसपणामुळें, कित्येकदां आरोपीच्या पूर्वचारित्र्याचा पगडा अधिक बसून तर कित्येकदां न्यायाधिशाच्या पूर्वग्रहांचा जोर अधिक होऊन, गुन्हेगारास फिर्यादीच्या खर्चासह मुक्तता, तर निर्दोषी माणसास दंडासह तुरुंगवास, यांचा लाभ होतोच कीं नाहीं ? मग अशा तऱ्हेच्या मनुष्यनिर्मित दैवयोगापेक्षां, ज्यास कांहीं नांवगांव नाहीं अशा दैवयोगावर न्यायदान अवलंबून ठेवण्यांत भगदत्तानें बराच मुत्सद्दीपणा व शहाणपणा दाखविला होता असें कोणीं म्हटल्यास तें म्हणणें विचार करण्यासारखें खचित होतें. असो. राजा भगदत्ताच्या न्यायपद्धतीचें वकिलीसमर्थन करण्यासाठीं ही कथा लिहिली नसून तमिुळें बिचाऱ्या लीलेवर केवढा बिकट प्रसंग ओढवला हें आम्हांस सांगावयाचें आहे.

लीलावतीवर राजा भगदत्ताचें अगदीं प्राणापलीकडे प्रेम होतें. बिचारीची आई निवर्तल्यापासून भगदत्ताला ती आणि तिला भगदत्त यांखेरीज दुसरें कोणी नव्हतें. लीला अगदीं हुबेहूब आपल्या आईची प्रतिमा होती. आधींच राजकन्या आणि त्यांत तरुण आणि सुंदर ! मग ती सगळ्या दैवनगराची सौभाग्यलक्ष्मी होऊन बसली तर त्यांत काय नवल ! लीलावती मूर्तिमंत सौंदर्यलतिका होती व त्या लतिकेच्या आयुष्यांतील तो

वसंत ऋतु होता. स्वाभाविकच तिला एका नवीन प्रेमाची पालवी फुटली होती. अगदीं स्पष्ट शब्दांत सांगावयाचें म्हणजे, दैवनगरींतील पराक्रमी व लोकप्रिय सरदार चंद्रोदय याजवर लीलेचें प्रेम जडलें होतें, व तोही तिजवर तितकाच अनुरक्त झाला होता. दोघेंही तरुण, दोघेंही सुस्वरूप व दोघेंही एकमेकांचीं चहातीं; मग त्यांनीं एकमेकांशीं विवाहबद्ध होण्याची लालसा धरूं नये तर कोणीं धरावी ? राजा भगदत्त याचीही सरदार चंद्रोदयावर पूर्ण मर्जी होती. तो त्याला त्याच्या पराक्रमाला व इभ्रतीला साजेल अशाच इतमामानें वागवी. कदाचित् हा सारा मानमरातब, चंद्रोदय पराक्रमी व लोकप्रिय होता म्हणूनही असेल. तें कसेंही असलें तरी चंद्रोदयाचा थाट फारच अप्रतिम असे हें खरें. त्याला राजवाड्याजवळच एक भव्य बंगला बांधून देण्यांत आला होता. कधीं कधीं राजा भगदत्ताबरोबर भोजन करण्याचा बहुमानही त्यास मिळत असे. अशा सुप्रसंगांची परिणति लीला-चंद्रोदयांच्या नेत्रमीलनांत होऊन त्यांच्या हृदयांत एकमेकांचीं मधुर चित्रें कायमचीं ठाणें देऊन बसावीं हें अगदीं स्वाभाविकच होतें. आपल्या ऐश्वर्यप्रदर्शनाच्या व उदारमतवादित्वाच्या भरांत राजा भगदत्ताच्या लक्षांत ही गोष्ट बरेच दिवस आली नव्हती. पण एक दिवस चंद्रोदयाच्या एका अज्ञात शत्रूनें भगदत्ताच्या कानांत विष ओतलें! झालें. राजा भगदत्त अगदीं खवळून गेला. भगदत्त अगदीं न्यायी—त्याच्या प्रामाणिक मताप्रमाणें—न्यायी व प्रेमळ होता खरा; परंतु या जगांत जर त्याला सर्वांत अधिक प्यारी एखादी वस्तु असेल तर ती इभ्रत होती. चंद्रोदय पराक्रमी असेल, सुस्वरूप असेल, सच्छील असेल, आणखी कितीतरी असेल; पण म्हणून काय झालें! इतके सर्व गुण असले म्हणून तो कांहीं राजघराण्यांतला ठरत नव्हता. तो उच्च कुळांतील असेल, पण किती केलें तरी राजघराणें तें राजघराणें! आपला दर्जा विसरून राजघराण्यांतील एका कुमारिकेवर आणि तेंही खुद्द त्याच्या लीलेवर प्रेम करण्यांत चंद्रोदयानें फारच अक्षम्य अपराध केलेला होता. भगदत्ताचें माथें अगदीं फिरून गेलें. चंद्रोदयाला शासन करण्यांत आपल्या हातून केवढा अन्याय होणार आहे, येवढेंच नव्हे तर त्यामुळें त्याजवर अनुरक्त असलेल्या आपल्या एकुलत्या एक मातृहीन कन्येला दुःखसागरांत लोटून आपण पर्यायानें आपलेंच किती

नुकसान करीत आहों, याचाही त्या संतापाच्या भरांत भगदत्ताला विचार राहिला नाहीं. त्यानें बरोबर पंधरा दिवसांनीं चंद्रोदयाच्या अपराधाची चौकशी करण्याचें ठरविलें व तेवढ्या मुदतींत चंद्रोदयानें आपल्या तर्फेच्या दैवी साक्षीपुराव्याची व्यवस्था करावी असें त्यास कळविलें.

बिचारा चंद्रोदय ! बिचारी लीलावती ! दोघेंही अत्यंत व्यथित होऊन गेलीं. प्रत्यक्ष भगदत्तापुढें चंद्रोदयाच्या दैवाचें काय चालणार ? आणि त्याच्या चौकशीचा निकाल कसाही लागला तरी त्याला त्याचें सुखदुःख काय होतें ! त्याच्या ऐश्वर्याला कळस चढविणारी व त्याच्या पराक्रमाचें, किंबहुना सर्व आयुष्याचें सार्थक करणारी त्याची हृदयदेवता त्याजपासून हिरावून घेतल्यावर त्याला जगणें आणि मरणें यांत कांहींच फरक वाटत नव्हता. आणि चंद्रोदय नाहींसा झाल्यावर लीलावतीला अंधकाराखेरीज काय दिसणार होतें ? लीलावती धीट व धोरणी खरी; पण भगदत्तापुढें तिचें कांहींच चालेना. ती अगदीं व्याकुळ होऊन गेली. तिनें चंद्रोदयाची चौकशी न करण्याविषयीं भगदत्ताची नानाप्रकारें समजूत घालण्याचा यत्न केला. केवळ राजघराण्यांत जन्म न घेण्याच्या दैवी अपराधाखेरीज चंद्रोदयाचे अंगीं दुसरें काय वैगुण्य आहे असा तिनें भगदत्तास सवाल केला. पण भगदत्त मुळीं तिच्या त्या प्रश्नाकडे दुर्लक्षच करी, व एकादे वेळीं फारच त्रासून, 'तूं त्याच्यावरील प्रेमानें अंध झालेली असल्यामुळें तुला या राजकारणांतील इभ्रतीचें महत्त्व कळणें शक्य नाहीं', असें जरा ओरडून उत्तर देई व तिला गप्प बसवी. बिचारी लीलाही आपणांस राजघराण्यांत जन्म घेतल्याच्या अपराधाबद्दल हें दैवी शासन होत आहे, असें आपलें समाधान करून घेत आपले अश्रु पुशी.

चंद्रोदयाच्या चौकशीला आतां सारा चार दिवसांचा अवधि होता. लीलावतीच्या हृदयाचें अगदीं पाणी होऊन गेलें. लवकरच आपल्या आयुष्याची अमावास्या होणार, या भीतीच्या कृष्ण छायेनें तिचें हृदय व्याप्त होऊन गेलें होतें. आजपासून पांचव्या दिवशीं चंद्रोदय कोठें असेल ? भू-लोकाला कंटाळून तो चंद्र स्वर्गाच्या निर्मल वातावरणांत प्रवेश करील व तेथें आपल्या तेजानें अधिकच चमकूं लागेल. पण मग आपली वाट काय ? चंद्रोदय निघून गेल्यावर या जगांत काय अर्थ उरणार आहे ? पण त्यानें व्याघ्राचें तळघर न उघडतां दुसरें उघडलें तर ?...कोण ! स्नेहमयी ? अमात्यांची

कन्या ! आपल्या—सर्वस्वीं आपल्या—चंद्रोदयावर प्रेम करणारी व आपल्या सुखस्वप्नांत व्यत्यय आणूं पहाणारी दुष्ट सवत ! कोणालाही न कळणारें तें तळघराचें रहस्य लीलावतीनें मोठ्या प्रयासानें हस्तगत करून घेतलें होतें, व त्यायोगानें तिच्या क्षुब्धतेंत अधिकच भर पडली होती. समुद्र शांत खरा पण तो वादळ नसेल तेव्हां ! स्नेहमयी चंद्रोदयावर निस्सीम प्रेम करीत असे हें लीलेस पूर्ण माहीत होतें, व चंद्रोदयानेंही कित्येकदां तिजकडे स्मितपूर्वक दृष्टिक्षेप केल्याचें तिला पक्कें स्मरत होतें. स्त्रियांच्या अंगीं स्वभावतःच वसत असलेलें संशयपिशाच्च जागृत होण्यास येवढें कारण पुरें होतें. लीलेच्या हृदयांत विकारांचें भयंकर वादळ सुटलें, त्यांत मत्सराचा प्रचंड वडवाग्नि भडकला ! आपल्या हृदयमंदिरांतील चंद्र अस्त पावून चंद्रोदय हा स्नेहमयीच्या हृदयसिंहासनावर चमकणारा चंद्रोदय ठरणार ! लीलावतीस आपलें सर्व शरीर अग्नीचेंच केलें आहे कीं काय असें वाटूं लागलें. आपल्या दुःखाश्रूंची माळ गुंफून ती आपल्या हातांनीं चंद्रोदय स्नेहमयीच्या गळ्यांत घालणार ! हें दृश्य लीलेस सहन होईना. त्यापेक्षां—त्यापेक्षां चंद्रोदय कायमचाच नाहींसा झाला तर ? लीलेस तेंही दृश्य पहावेना. तिनें आपले डोळे मिटून घेतले, तों तिच्या मनश्चक्षूंपुढें त्या व्याघ्राचे तीक्ष्ण डोळे काजव्याप्रमाणें चमकूं लागले, तिच्या कानांत चंद्रोदयाची करुण किंकाळी दुमदुमूं लागली. छे ! छे ! लीलावती ही स्त्री होती. तिचें हृदय त्या भयंकर कल्पनेनें फुटून जाण्याची वेळ आली. आपणापाशीं नाहीं तर नाहीं, चंद्रोदय कोठेंही सुखी असला म्हणजे झालें. पण त्याच्याचबरोबर ती दुष्ट स्नेहमयी सुखी होईल त्याची काय वाट ? बेहेत्तर आहे आपला चंद्रोदय व्याघ्रमुखीं पडला तरी.......लीलेचें चित्त द्विधा झालें. तिला कांहींच सुचेना.

न्यायदानाची घटका येऊन ठेपली. न्यायमंदिर प्रेक्षकांनीं चिकार भरून गेलें होतें. मंदिराच्या एका बाजूस विवाहसमारंभाची तयारी व दुसऱ्या बाजूस अस्थिसंस्काराची व्यवस्था ठेविलेली होती. राजा भगदत्त आपल्या उच्च सिंहासनावर बसला असून त्याच्या शेजारीच राजकन्या लीलावतीचें उच्चासन होतें. तिच्या मुद्रेवर कोणताच मनोविकार दिसत नव्हता. ती एकाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें निश्चल व स्तब्ध बसली होती. चंद्रोदयास

मंदिरांत आणण्यांत आलें. त्याचीही मुद्रा निर्विकार परंतु निश्चयी दिसत होती. आपल्या दैवाची परीक्षा पहाण्यापूर्वी राजा भगदत्ताला अभिवादन करण्यासाठीं चंद्रोदय त्याच्याजवळ आला. त्याला मुजरा केल्यावर, आपल्या लाडक्या लीलेला, नव्हे तर राजकन्या लीलावतीबाईंना त्यानें कंपित हस्तानें मुजरा केला व क्षणभर–अगदीं एकच क्षण–तिजकडे अर्थपूर्ण नजरेनें अगदीं रोखून पाहिलें. लीलावती आपल्या दैवाची गुरुकिल्ली हस्तगत करून घेऊन आपणांस योग्य मार्ग दाखविणार, याविषयीं चंद्रोदयास मुळींच संशय नव्हता. लीलावतीनें रीतीप्रमाणें मुजरा परत करण्यासाठीं आपला हात वर उचलला व अगदीं सहज लीलेनें बोटें हलवावीं त्याप्रमाणें अंगुलिनिर्देश केला.

चंद्रोदय उमजला. तो सरळ चौथऱ्यावर गेला व त्यानें एका तळघराचें कुलूप काढलें !

आंतून कोण आलें ? वाचक ! निष्ठुर व्याघ्र कीं कोमल स्नेहमयी ?



# विषाची परीक्षा



"आजकालच्या लोकांत कांहीं रामच नाहीं. आम्ही हिंदुस्थानांतील पुरुष आणि बायका यांत पेहरावाचाच काय तो फरक." माधव आवेशानें हातांतील पोळीचा तुकडा ताटांत आपटून म्हणाला. "आमच्यापेक्षां ठगपेंढारी तरी हजार पटीनें बरे."

"हें काय म्हणतो आहेस तूं माधव! अरे, आम्ही शूर नसलों म्हणून काय चोर-दरोडेखोरांपेक्षांही नीच—"

"हो, हो! चोर दरोडेखोरांपेक्षांही आपण कमी प्रतीचे आहों असेंच माझें म्हणणें आहे. त्यांचा व्यवसाय वाईट—अगदीं निंद्य कां असेना; पण ते तो आपल्या जिवावर उदार होऊन करीत असतात. त्यांच्या अलोट धैर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच. नाहीं तर आम्ही! कोठें आमचे पराक्रमी पूर्वज आणि कोठें आम्ही."

"पण असल्या वाईट कामांत दाखविलेलें धैर्य काय कामाचें?" भगिरथ म्हणाला.

"अरे, अंगांत धैर्य असलें म्हणजे तें वाईट अगर चांगल्या, कसल्याही कामीं लावतां येतें. आमच्या शिवाजीबाजींच्या अंगीं पराक्रम होता म्हणूनच त्यांना स्वराज्यसंपादन करतां आलें ना?" माधवनें उलट सवाल टाकला.

"पण परिस्थितीकडेही थोडी नजर दिली पाहिजे."

"कसली आली आहे परिस्थिति! म्हणे परिस्थिति! परिस्थिति अनुकूल असल्यावर मग आपली मातब्बरी ती काय? शिवाजीला स्वराज्य स्थापायला अगर आजकालच्या पठाण लोकांना चोऱ्या करायला काय अनुकूल परिस्थिति आहे वाटतें? अंगांत धमक नसली म्हणजे हजार सबबी सुचतात. म्हणूनच मी म्हणतों कीं, आमच्यापेक्षां चोर-दरोडेखोर शतपटीनें बरे."

भगिरथ यावर कांहीं बोलला नाहीं. तो मुकाट्यानें पानावरून उठला

व हात धुवून आपल्या खोलींत जाऊन सिगारेट ओढीत बसला. त्यानें माधवाला कांहींच उत्तर दिलें नाहीं; परंतु त्याच्या बोलण्याचा तो आपल्या मनांत एकसारखा विचार करीत होता. भगीरथाचा स्वभाव एरव्हीं शांत व विचारी खरा; परंतु एकदां एकादी गोष्ट त्याच्या मनानें घेतली, कीं ती सोडण्यास तो कधींही तयार होत नसे. आपणांपेक्षां चोरदरोडेखोर खरोखरच एका दृष्टीनें श्रेष्ठ आहेत असें त्यास वाटूं लागलें. आपल्या या आयुष्यांत काय जीव आहे ? माधव म्हणाला तें कांहीं खोटें नाहीं. आज सात वर्षें झालीं, अकरा वाजले कीं शाळेंत जायचें व पांच वाजले कीं घरीं परत यायचें, यापलीकडे आपण काय केलें आहे ? जगाला नाहीं तर स्वतः-ला तरी आठवण राहण्याजोगें आपल्या हातून कांहीं घडलें आहे काय ? शाळेंतील निर्जीव पोरांना छड्या मारण्यापेक्षां अधिक पराक्रम आपल्या हातून कधीं झाल्याचें भगीरथास आठवेना. लढाई करायला तर राहोच, पण नुसतं जग पहायला देखील तो आपल्या घरकुलाच्या बाहेर कधीं पडला नव्हता. भगीरथास आपलें जिणें खरोखरच व्यर्थ होय असें वाटूं लागलें. इतकें निष्क्रिय आयुष्य आपण इतके दिवस कंठलें तरी कसें याचेंच आतां त्याला नवल वाटूं लागलें. कांहीं तरी पराक्रम, कांहीं तरी शौर्य प्रकट करणारें कार्य आपल्या हातून झालेंच पाहिजे अशी उत्कट इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. आपण पुरुषासारखे पुरुष, तेव्हां आपल्या अंगीं उपजत धैर्य असलेंच पाहिजे; आपण त्याचा कधीं उपयोगच केला नाहीं तर तें आपल्या अंगीं आहे याची आपणांस खात्री तरी कशी पटावी ? एकाद्या लढाईवर गेलें तर ? पण तितकें आपलें सुदैव कोठें आहे ! आपण हिंदुलोक निःशस्त्र, बोलूनचालून गुलाम. शिवाय–शिवाय लढाईंत कायमचेच दगावण्याचा संभव ! आपलें धैर्य पारखून पहाण्यास सध्यांच्या परिस्थितींत एकच उपाय आहे, व तो म्हणजे चोरी करून पहाणें हा होय. चोरी करण्यांत धैर्य नाहीं असें कोण म्हणेल ? प्रतिक्षणीं पकडले जाण्याची भीति असतांना एकाद्याच्या घरांत शिरण्यास—पहा नुसता हा विचार मनांत येतांच आपल्या अंगावर शहारे आले. बस्स्, ठरला विचार. आज रात्रीं कोठें तरी चोरी करायचीच. चोरी करणें वाईट खरें पण तें केव्हां ? हेतु वाईट असेल तेव्हां. आपला हेतु कांहीं वाईट नाहीं; उलट चांगलाच आहे.

आपणांस चोरीचें द्रव्य मुळींच नको आहे. वाटल्यास आपण तें मालकाच्या घरांतच टाकून येऊं, पण त्याच्या हातीं सांपडलों तर–तर काय ? या भीतींतच सारी मख्खी आहे, या भीतीला तोंड देण्यांतच आपलें धैर्य आहे. बरें, न सांपडलों तर बरेंच झालें. कांहीं झीज न लागतां आपला प्रयोग यशस्वी होईल व आपल्या मनाचें समाधानही होईल.

भगीरथाचा स्वभाव आधींच एककल्ली, त्यांत माधवच्या बोलण्यानें त्याच्या अंगांत वारें शिरलेलें व त्याला सिगारेटच्या धुराची जोड. मग त्याच्या निश्चयापासून त्याला परावृत्त करण्याचो प्रत्यक्ष नलिनीचीदेखील काय प्राज्ञा होती ! काम आटोपल्यावर ती सहज खोलींत आली, तों स्वारी वामकुक्षी न घेतां पटईकडे पहात खुर्चीवर बसून राहिलेली. निश्चयी स्वरांत भगीरथानें तिला आपला हेतु निवेदन केला. नलिनीला त्याचा हुकमी स्वर ऐकण्याची संवय होती; परंतु त्या स्वरांत आज बाहेर पडलेले उद्गार ऐकून ती अत्यंत घाबरून गेली. पण, जों जों ती आपली भीति दर्शवूं लागली तों तों त्याला माधवच्या बोलण्याचाच प्रत्यय येऊं लागला, व त्याच्या अंगांतिल शिवाजीबाजींचें रक्त सळसळूं लागलें. त्यानें नलिनीस झांशीच्या लक्ष्मीबाईची व पुण्याच्या आनंदीबाईची आठवण करून दिली, पण व्यर्थ ! चांगला हेतु व वाईट कर्म यांतील तात्त्विक मिलाफ तिच्या डोक्यांत कांहीं केल्या होईना. तिच्या भेकड स्वभावामुळेंच तिला आपला बेत पटत नाहीं असें वाटून भगीरथानें तिच्याशीं वाद घालण्याचें सोडून दिलें. मात्र आपला बेत कोणालाही न कळविण्याची त्यानें तिला सक्त ताकीद दिली. बिचाऱ्या माधवला आपण सहज ओढलेल्या काडीनें केवढी आग भडकली याची मुळींच वार्ता नव्हती. माधव भगीरथाचा जिवलग स्नेही. दोघेही एकाच शाळेंत मास्तर. आज रविवार म्हणून माधव सहज भगीरथाकडे जेवायला आला होता, पण बऱ्याच वह्या तपासायच्या असल्यामुळें तसाच लगबगीनें तो आपल्या घरीं परत गेला होता.

लगेच संध्याकाळच्या गाडीनें मुंबईला जाण्याची भगीरथानें तयारी केली. त्याचें गांव मुंबईपासून दोन तासांच्या अंतरावर होतें. यदाकदाचित् आपण घरमालकाच्या हातीं सांपडलोंच तरी आपण आपला उदात्त हेतु त्याला नीट समजावून सांगूं. तो समजल्यावर त्याला राग न येतां उलट तो आपली

तारीफच करील; आणि यदाकदाचित् तो संतापलाच तरी आपणांजवळ खुणेच्या एकाद्या क्षुल्लक वस्तूशिवाय चोरीचा माल कांहींच न सांपडल्यामुळें आपणास शिक्षाही जवळजवळ मुळींच होणार नाहीं; आपला उदात्त हेतु न समजण्याइतका न्यायाधीश तरी खास मूर्ख नसेल. अशा रीतीनें भगीरथानें नलिनीची समजूत घालण्याचा यत्न केला. तिची समजूत पटो अगर न पटो, तो तिचें थोडेंच ऐकणार होता! बिचारीला मनांतल्या मनांत देवी जगदंबेला एक दोन नवस करून स्वस्थ बसण्यापलीकडे कांहींही करतां येणें शक्य नव्हतें. रात्रीं आपला पराक्रम गाजवून दुसरे दिवशीं, म्हणजे सोमवारीं सकाळच्या गाडीनें परत येऊन शाळेंत कामावर हजर व्हावयाचें व माधवला सर्व हकीगत सांगून व खुणेची वस्तु दाखवून चकित करून सोडायचें असा भगीरथानें बेत केला.

रात्रीं दहा वाजण्याचा सुमार होता. वाळकेश्वर रोडवरून भगीरथ हलके हलके चालला होता. तो विचारांत इतका गुंग होऊन गेला होता, कीं आपण कशासाठीं व कोणीकडे चाललों आहों याचें त्याला मुळींच भान नव्हतें. तो ग्रांटरोडवर जो गाडींतून उतरला तो वाट फुटेल तिकडे भटकत भटकत या रस्त्याला आला होता. चालतां चालतां त्याची नजर सहज उलट दिशेनें येणाऱ्या एका पोलिस शिपायाकडे गेली; त्याबरोबर त्याला आपल्या सद्धेतूची आठवण होऊन तो भानावर आला; पण तत्क्षणींच, तो हेतु ओळखूनच हा पोलिस इकडे येत नसेल ना, असा संशय त्याच्या मनांत येऊन तो चरकला. पण लगेच त्यानें आपलें मन घट्ट केलें. तो पोलिस आपल्या वाटेनें निघून गेला. आतां विलंब लावल्यास आपलें दुबळें मन पुन्हा कच खाईल, व ज्यासाठीं येवढा निश्चय करून आणि नलिनीचें मन दुखवून इतक्या लांब आलों तें सर्व फसून दुष्पट भ्याडपणा पदरीं येईल व स्वतःच्या बायकोपुढें मान खालीं घालण्याचा प्रसंग येईल, असा विचार करून भगीरथ आजूबाजूच्या बंगल्यांकडे व मधून मधून मागेंपुढें एका विवक्षित दृष्टीनें पहात हलक्या पावलांनीं चालूं लागला. रस्त्यावर रहदारी जवळजवळ मुळींच नव्हती. सगळीकडे स्वच्छ चांदणें पडलें होतें व त्या प्रकाशांत टुमदार बंगले व प्रत्येक बंगल्यापुढें छोटीशी बाग असा मनोहर देखावा दिसत होता. एरवीं असा देखावा पाहून भगीरथानें त्यावर एकादी

सुंदर कविता रचली असती; पण या वेळीं तो कवींच्याच माळेंत गोंवल्या जाणाऱ्या दुसऱ्या व्यक्तींच्या–वेड्यांच्या–सृष्टींत गेला होता. भगीरथानें एक बंगला पसंत केला व पुन्हा एकदां सभोंवार पाहून त्यानें चटकन् फाटकावरून आंत उडी मारली. भगीरथाला उडी मारण्याची कधींच संवय नव्हती. दोन वर्षांपूर्वीं तो एकदां जिन्यावरून पाय घसरून पडला होता, तीच काय ती त्याची अलीकडची उडी. पण प्रसंगानें मनुष्याला धैर्य येतें म्हणतात तें असें. भगीरथानें आंत उडी तर मारली; पण त्याच क्षणीं परत फिरावें अशी प्रबल इच्छा त्यास झाली. परंतु आतां माघार घेणें नामुष्कीचें तर खरेंच; परंतु यंत्रांत सांपडलेला हात काढून घेण्याचा यत्न करण्यासारखें धोक्याचेंही आहे असा विचार करून त्यानें आत्मसंयमन केलें व तो बंगल्याच्या मागील बाजूस गेला. आंत सर्व सामसूम होतें. बंगल्यांतील दिवेही सर्व मालविलेले होते. मागच्या बाजूस एक लोखंडी वाटोळा जिना होता. परंतु अशा राजमार्गानें जाण्याचें भगीरथाला धैर्य होईना. तो मनानें अगदीं धर्मराज असला तरी येथें चोरी करण्यासाठीं आला होता व चोराला साजेल अशाच मार्गानें जाण्याची त्याला बुद्धि होणें अगदीं स्वाभाविकच होतें. जिन्याच्या जवळच भिंतीसरसा खालीं सोडलेला सांडपाण्याचा नळ होता, त्या नळावरून वर चढावें व एकाद्या खिडकींतून आंत प्रवेश करावा म्हणून तो एखाद्या सरावलेल्या गारुड्याप्रमाणें सरसर वर चढूं लागला, व लगेच दुसऱ्या मजल्याच्या खिडकीशीं जाऊन पोहोंचला; तों ती खिडकी बंद असल्यामुळें आणखी एक मजला वर गेला, तों तेथली खिडकी उघडीच होती. आतां विचार करण्यास मुळींच वेळ नव्हता व भगीरथ विचार करण्याच्या मनःस्थितींतही नव्हता. एकाद्या सिनेमांतील चित्राप्रमाणें तो मुकाट्यानें पण जलद हालचाल करीत होता. भगीरथानें खिडकींतून किंचित् काळ आंत डोकावून पाहून उडी मारली. चांदण्याचा प्रकाश खोलीच्या बऱ्याचशा भागावर पडला होता. आंत गेल्यावर मात्र भगीरथ इतका बावरून गेला कीं, पुढें काय करावें हें त्याला कांहींच सुचेना. इकडे तिकडे पहात तो खोलीच्या दाराशीं गेला, तों तें आंतून बंद. खोलींत मनुष्य तर कोणीही नव्हतें, मग दार आंतून बंद कसें ? दुसरें एकादें दार असेल म्हणून भगीरथ सर्व खोली तपासूं लागला. खोलींत एक पलंग व त्याखालीं थोडीशी अडगळ यांखेरीज कांहीं

सामान नव्हतें. खोली तपासतां तपासतां भगीरथ पुन्हा खिडकीशीं आला व त्यानें सहज बाहेर डोकावून पाहिलें; त्याबरोबर तो एकदम चपापला. तो ज्या नळावरून आला होता त्याच नळावरून चढून एक व्यक्ति झपाझप वर येत होती. भगीरथाची पांचावर धारण बसली. ही व्यक्ति कोण ? हा या खोलीचा मालक तर नसेल ? पण तो अशा चोरवाटेनें कशाला येईल ? का दुसरा एकादा खरोखरीचा चोर आहे ? किंवा आपला स्नेही माधव आपल्याच हेतूनें प्रेरित होऊन नेमका इथेंच आला आहे, का त्याला आपल्या बेताचा सुगावा लागल्यामुळें तो आपल्याला परत नेण्यासाठीं आला आहे ? इत्यादि विचार क्षणार्धांत भगीरथाच्या मनांत येऊन गेले. तो कोणी का असेना; तो वर येऊन पोहोंचण्याच्या आंत आपणाला कोठें तरी लपलें पाहिजे, अशी भीतिजन्य प्रेरणा भगीरथाला झाली. आपण खोलीचें निरीक्षण करण्यांत व्यर्थ वेळ घालविला, त्यापेक्षां हातीं लागेल ती वस्तु घेऊन त्याच पावलीं परत फिरलों असतों तर हा प्रसंग ओढवला नसता, असें भगीरथाला वाटूं लागलें; पण आतां उपयोग काय ? भगीरथ चटकन् मागें फिरला व खोलींतील पलंगाखालीं दोन लठ्ठ पेट्या होत्या त्या दोहोंच्या मध्यें सरपटून पालथा पडून राहिला. इतक्यांत ती व्यक्ति आंत आली व लगेच् हुश्श हुश्श करीत पलंगावर येऊन पडली. भगीरथाचा जीव वर खालीं होत होता, तो आतां थोडासा खालीं पडला. निदान अजून तरी त्यानें आपणाला पाहिलें नाहीं हें बरें आहे; पण पुढें काय ? आपण होऊन पलंगाखालून बाहेर येऊन त्यास आपलें चारित्र्य व आगमनप्रसंग निवेदन करावा किंवा कसें ? पण त्यास तें सर्व थोतांड वाटून–व तें तसें वाटणारच असें भगीरथास आतां निश्चितपणें वाटूं लागलें–त्यानें आपली मानगुटी धरून आपणास खिडकींतून बाहेर लोटून दिलें, अगर छातींत सुरी खुपसून ठार मारून टाकलें तर ? मग ही धैर्याची परीक्षा न होतां विषाचीच परीक्षा ठरणार ! मग बिचाऱ्या नलिनीचें कसें होईल ? भगीरथास बाहेर निघण्याचें धैर्य होईना. त्या खोलींत शिरल्यापासून त्याच्या अंगांतील शिवाजीबाजींचें रक्त त्यास दगा देऊन जें गोठून बसलें होतें तें कांहीं पुन्हा गरम होईना. हा मनुष्य ज्या अर्थीं पलंगावर स्वस्थ पडून राहिला आहे त्या अर्थीं तो या खोलींत रहाणारा मालकच असला पाहिजे, पण तो अशा आडवाटेनें कां

आला हें भगीरथास उमजेना. परंतु या गोष्टीची मीमांसा करण्यापेक्षां आधीं हातांपायांना लागलेली कळ कशी घालवावयाची याचा भगीरथास अधिक विचार पडला. इकडेतिकडे सरकावें तर त्या आधाजानें तो मनुष्य जागा होईल या भीतीनें तो बराच वेळ तसाच पडून राहिला; पण आतां त्याच्यानें दम निघेना. सरकण्याचा आवाज टाळायला जावें तों कळ लागल्यामुळें ओरडण्याची पाळी आली. शेवटीं नाइलाजानें शक्य तितक्या सावकाश एक पेटी थोडी बाजूस सारून कुशीला वळण्याचा त्यानें यत्न केला. पेटी थोडीशी सरकली; व भगीरथाच्या दुर्दैवानें तीवर कायसा जिन्नस होता तो जमिनीवर आदळला. त्याबरोबर पलंगावरचा मनुष्य एकदम दचकून उठला व एका क्षणांत खिशांतील विजेचा दिवा हातांत घेऊन तो इकडेतिकडे पाहूं लागला. भगीरथाची अगदीं गाळण उडून गेली. आतां तरी त्यास आपलें हृद्गत व सद्धेतु निवेदन करावा असें त्याच्या मनांत आलें; पण तोंडांतून शब्द निघेल तर शपथ! उलट श्वासोच्छ्वासाचाही आवाज होऊं नये म्हणून त्यानें तो आंवरून धरला. आणखी दहावीस सेकंदांतच भगीरथास आपल्या तोंडावर चक्क उजेड व त्या उजेडांत आपल्या कपाळावर रोंखलेलें पिस्तुल स्वच्छ दिसलें. त्याच उजेडांत त्याला आपल्या डोळ्यांपुढें काजवे चमकलेले दिसूं लागले!

"कोण आहेस तूं? बोल लवकर. इथें कशाला आलास, कां आलास, केव्हां आलास? लवकर बोल, नाहीं तर, एक दोन, तीन, दहा अंक मोजण्याचे आंत तुझा कपाळमोक्ष करून टाकतों, बोल."

"म-म माफ करा, मी—मी— चोर नाहीं—माझा हेतु—"

"काय, मी चोर नाहीं? चोर नाहींस तर कोण आहेस? हरामखोरा, चोर नाहींस तर इथें कशाला आला आहेस?"

"सांगतों. मी मास्तर आहें. माझा हेतु—पण मला मारूं नका म्हणजे सारें सांगतों."

"नाहीं, सांगेपर्यंत नाहीं मारीत. तूं मास्तर आहेस तर इथें काय शाळा समजून आलास वाटतें? लवकर सांग तुला काय सांगायचें आहे तें"

मोठ्या सुदैवानें आपला बचाव करण्याची व त्या मनुष्याकडून शाबासकी मिळविण्याची आलेली ही संधि घालवितां कामा नये असा विचार करून

भगीरथानें मोठा धीर करून त्यास आपला वृत्तान्त व हेतु निवेदन केला. तो ऐकून तितक्या रागांतही त्या मनुष्यास मोठी मौज वाटली. कदाचित् हा मनुष्य खरोखरीच लफंगा असून आतां कांहीं तरी बतावणी करीत असेल, अशी शंका त्याच्या मनांत आल्यावांचून राहिली नाहीं; परंतु भगीरथाचा एकंदर पोषाख, त्याची मुद्रा व बोलण्याची पद्धत पाहून, हा खरोखरच क्षणिक वीरश्रीच्या भ्रमानें गोत्यांत आलेला एक उल्लू तरुण आहे अशी त्याची खात्री झाली. रामसिंग एका लुटारू टोळीचा म्होरक्या असून या खोलींत त्याची गुप्त कचेरी होती, व बाहेरून कुलूप घालून तो नेहमीं मागच्या बाजूनें भिंतीवरून व्यवहार करीत असे. या शूर मास्तराचा आपणांस चांगला उपयोग होईल, तेव्हां याला असा सोडून उपयोगी नाहीं, असा विचार करून रामसिंग त्यास दरडावून म्हणाला, "छट्! मला मुळींच तुझें हें पुराण खरं वाटत नाहीं. हें सारं ढोंग आहे. तूं पक्का बदमाष आहेस. गुलामा, तुला आपल्या धैर्याची पारख करायची आहे नाहीं का? कर तर छाती पुढें कीं घालतों गोळी. आतां बऱ्या बोलानें माझ्या हुकुमाप्रमाणें वागलास तरच तुला जिवंत ठेवीन. तुला आतां मास्तरकीचा कंटाळा आला आहे ना? कांहीं हरकत नाहीं. तूं पुन्हा विद्यार्थी हो. तूं जो धंदा शिकायला आरंभ केला आहेस त्या धंद्यांत मीं आज दहा वर्षें घालविलीं आहेत. तूं माझ्या हाताखालीं शिकून चांगला तयार हो, म्हणजे चोरी करतांना पुन्हा असा कधीं सांपडणार नाहींस."

"पण माझा हेतु—"

"त्या गोष्टी आतां राहूं दे. तुझा हेतु मला नको आहे. आतां माझा हेतु मी तुला सांगतों आहें, त्याप्रमाणें वागण्यास बऱ्या बोलानें तयार हो, नाहीं तर हें माझ्या हातांत काळें काय आहे हें तुला माहीतच आहे. चल आतां माझ्याबरोबर पहिला धडा घ्यायला."

आतां अधिकउणें बोलण्यांत अर्थ नाहीं असें पाहून भगीरथ मुकाट्यानें रामसिंगाबरोबर गेला व त्यानें मारलेला डल्ला हमालाप्रमाणें खांद्यावर टाकून त्याच्याबरोबर पुन्हा त्याच्या बिऱ्हाडीं परत आला. वाटेंत मोठमोठ्यानें आरडाओरड करून पोलिसास हांक मारावी असें त्याच्या मनांत आलें; पण एक तर आपण रामसिंगाचे साथीदार म्हणून पकडले जाणार;

व दुसरें, आपल्या तोंडून शब्द निघतांच रामसिंगाच्या पिस्तुलांतील गोळी आपल्या घशांतून आरपार जाणार, याबद्दल भगीरथास मुळींच संशय नव्हता. खोलींत परत आल्यावर रामसिंगानें खूष होऊन लुटींतील थोडासा वांटा— शंभराची एक नोट—भगीरथाच्या हातांत टाकली. ती परत फेंकण्याचीही भगीरथाची छाती नव्हती. भगीरथ पळून जाणार नाहीं इतक्या बेतानें त्याला बांधून ठेवून रामसिंग खिडकींतून खालीं उतरून पुन्हा बाहेर निघून गेला. रोज असाच क्रम चालू झाला. कोठून हा उपद्याप केला असें भगीरथास होऊन गेलें. दुर्दैव तरी काय पहा! एखाद्या सभ्य गृहस्थाच्या घरीं चोरी करायला गेलों असतों तर त्यानें आपणांस निदान पोलिसचौकीवर तरी नेऊन गुदरलें असतें, व काय शिक्षा भोगायची ती भोगून आपण पुन्हा मोकळे झालों असतों. नलिनी व माधव यांना काय वाटत असेल? माधवाला आपला बेत कळल्यावर तो पोलिसांत चौकशी करील; पण पोलिसांच्या कैदेंत पडण्याइतकें भाग्यदेखील आपल्या नशिबीं नाहीं. या विचारांनीं भगीरथ अगदीं दुःखित होऊन गेला. रामसिंग त्याला जाऊं देण्याइतका मूर्ख नव्हता. हा मोकळा सुटल्यास आपलीं शंभर वर्षें भरण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं हें तो जाणून होता. त्यानें भगीरथास पूर्ण अटकेंत ठेविलें होतें. फक्त रात्रीं आपल्या मदतीला त्याला घेऊन जावें, तेंही अगदीं पिस्तुलाच्या टप्प्यांत व दिवसा त्याला कोंडून ठेवावें; असा त्यानें क्रम चालविला होता.

अशा रीतीनें कांहीं दिवस गेले. सुटका होण्याची आशाच न उरल्यामुळें म्हणा अगर संवयीमुळें म्हणा, भगीरथाचें दुःख आतां बरेंच कमी झालें होतें. मिळालेल्या लुटींतला वांटा रोजच्या रोज त्याला देण्यांत रामसिंग कधींही चुकत नसे; उलट त्या वांट्याचें प्रमाण तो एकसारखें वाढवीतच होता. भगीरथ प्रामाणिक मास्तर होता, तसाच रामसिंगही आपल्या धंद्यांत प्रामाणिक होता. भगीरथाच्या खाण्यापिण्याचेंही तो कधीं हाल होऊं देत नसे. भगीरथाच्या खिशांत येवढ्या अवधींत कांहीं नाहीं तरी दोन तीन हजारांच्या नोटा जाऊन बसल्या होत्या व रोजच्या रोज त्या नोटांच्या भेटीला नवीन नोटा येतच होत्या. इतके पैसे मिळण्याचें तर राहोच; पण भगीरथाला साऱ्या जन्मांत कधीं दिसलेही नसते. शिवाय चोरी करण्यांतील कसब व निर-

निराळ्या शिताफीच्या युक्त्या यांबद्दलही भगीरथास हळूहळू अगदीं नकळत, नुकत्याच तारुण्यांत प्रवेश करणाऱ्या युवयुवतींच्या प्रेमाप्रमाणें, आवड उत्पन्न होऊं लागली होती. एवींतेवीं येथून सुटका होत नाहीं, मग येथेंच सुखी होण्याचा यत्न कां करूं नये? खाणेंपिणें व पैसे या गोष्टींना तर येथें कांहीं कमतरता नाहीं, उलट त्या बाजवीपेक्षां किती तरी जास्त मिळत आहेत. आतां हे पैसे चोरीचे आहेत व आपण असल्या वाईट कामांत रामासिंगास मदत करीत आहों हें खरें; पण त्याला आपला काय इलाज?— आपला हेतु कांहीं वाईट नव्हता व अजूनही नाहीं. वाईट हेतु नसतां उलट आपण सद्धेतूनें प्रेरित झालेलों असतां, दुर्दैवानें या राक्षसाच्या तडाक्यांत सांपडलों खरे. आतां निमूटपणें त्याच्या म्हणण्याप्रमाणें त्याला मदत केली तर निदान जीव तरी बचावेल, जिवंत असलों म्हणजे आज नाहीं उद्यां सुटून जाऊन सन्मार्गानें आयुष्य कंठण्यास सांपडेल. तसें न केल्यास मात्र प्राण गमाविण्यापलीकडे कांहींही निष्पन्न होणार नाहीं. येऊन जाऊन नलिनी-ची काय वाट होईल ही काळजी; पण काळजी करून काय उपयोग? अशा तऱ्हेनें भगीरथ आपल्या मनाची समजूत घालूं लागला.

आणखी कांहीं दिवस लोटले. चोरीच्या कसबांत भगीरथ आतां पूर्ण वाकबगार झाला असून त्या कलेची जोपासना करण्यांत तो अगदीं रंगून गेला होता. त्याचें हें नवीन शिक्षण पुरें झालें होतें आणि आपल्या गुरूचा विश्वास व मर्जी हींही त्यानें पूर्णपणें संपादन केलीं होतीं. परंतु आधुनिक स्वातंत्र्यप्रिय विद्यार्थ्यांप्रमाणें तो आपल्या गुरूस सोडून गेला नव्हता. तो रामसिंगानें सोंपविलेल्या कामगिऱ्या तर बिनचुक पार पाडीच; परंतु त्यानें सांगितल्यापेक्षांही जास्त व कधीं कधीं त्याच्या नकळतही कामगिऱ्या तो करूं लागला होता. आतां कधीं त्याला नलिनीची आठवण झालीच तर ती तिच्या दागिन्यांवरून होई; पण तीही क्वचितच. सुटून जाऊन सन्मार्गाला लागण्याची आतां त्याला इच्छाच राहिली नव्हती, व तसें करण्याचें धैर्यही त्याला आतां राहिलें नव्हतें. आडमार्गानें जाण्यांत तो आतां शूर बनला, पण सरळ रस्त्यानें जाण्याची त्याला भीति वाटूं लागली. पूर्वीं याच्या उलट स्थिति होती, इतकाच फरक.

नलिनी व माधव यांनीं आपल्याकडून शक्य तितका शोध केला; पण

व्यर्थ. ज्याअर्थी भगीरथाचा कांहींच तपास लागला नाहीं त्याअर्थी या विषाच्या परीक्षेंत त्याला मृत्यु आला असावा अशी समजूत करून घेऊन नलिनी स्वस्थ बसली.

भगीरथानें विषाची परीक्षा तर केली; पण तींतून तो सुरक्षितपणें पांर पडला—त्यानें तें विष पचविलें ! आतां लौकिकदृष्टीनें तो तींत दगावला हें खरें; पण भगीरथास आतां लौकिकदृष्टिच न उरल्यामुळें त्यास तसें वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें.



# काव्य आणि जग



नश्याम कांहीं सामान्य प्रतीचा कवि नव्हता; निदान त्या प्रांतांत तरी त्याच्या तोडीचा दुसरा कवि नव्हता. तो जसा प्रतिभावान् कवि तसाच अत्यंत कुशल टीकाकार होता. निरनिराळ्या प्राचीन व अर्वाचीन कवींच्या पोटांत शिरून, किंबहुना त्यांच्या कधीं स्वप्नांतही आल्या नसतील अशा कल्पना त्यांच्या कवितांतून काढून त्यांचें तो रसभरित वर्णन करी; त्यामुळें त्याच्या टीकालेखांनीं काव्यसृष्टीची दामदुप्पट होई. त्याच्या स्वतःच्या कविता अत्यंत हृदयस्पर्शी व भावनामय असत. प्रेमविषयक कविता लिहिण्यांत तर त्याचा अगदीं हातखंडा असे. राधा-कृष्णांच्या प्रेमकलहांतील निरनिराळे बहारीचे प्रसंग व त्यांच्या मनोविकारांतील अति सूक्ष्म छटा यांचें त्यानें केलेलें काव्यमय वर्णन वाचून वाचकांस असें वाटे कीं, या कवीच्या अंगांत रक्ताऐवजीं प्रेमरसच वहात असला पाहिजे. निरनिराळ्या वर्तमानपत्रांत व मासिकांत त्याच्या कविता, लेख, मुलाखती व फोटो वरचेवर प्रसिद्ध होत असत. घनश्यामची बायको जरी त्याच्या कवितांतील मर्म समजण्याइतकी फारशी शिकलेली नव्हती तरी ती अत्यंत सुशील व गृहकृत्यांत प्रवीण अशी होती. घनश्यामनें वर्णन केलेलें प्रेमाचें विश्वव्यापक स्वरूप व त्या प्रेमजालांतील निरनिराळे सूक्ष्म धागे या गोष्टी जरी तिच्या बुद्धीपलीकडच्या असल्या तरी ती अत्यंत प्रेमळ होती. प्रेम कसें करावें हें तिला माहीत नसलें, तरी ती घनश्यामावर निस्सीम प्रेम करी व त्याला आवडतील अशा गोष्टी करण्यांत नेहमीं चूर असे. तिच्या प्रेमाला नांवगांव नसलें तरी तिच्या हृदयांत तें मावत नसे, इतकें तें उत्कट होतें. घनश्यामचेंही तिजवर तितकेंच प्रेम होतें. तिनें केलेले त्याच्या आवडीचे पदार्थ खात असतां एकीकडे तो तिला आपल्या नवीन नवीन शृंगारिक कविता म्हणून दाखवी; त्या वेळीं त्या इतक्या बहारीच्या वठत, कीं त्या जर दुसऱ्या एखाद्या बाईनें ऐकल्या तर ती वेडी होऊन

जाईल, अशा काल्पनिक मत्सरानेंच लीला अस्वस्थ होई. कविता वाचून झाल्यावर, प्रेमाची भावना किती उदात्त व सर्व विश्वास एकत्र बांधून टाकणारी आहे याविषयीं घनश्याम तिच्याशीं अत्यंत रसाळ भाषेंत गोष्टी बोलत बसे.

अशा रीतीनें त्या जोडप्याचें आयुष्य अत्यंत सुखांत चाललें होतें. घनश्याम आधींच कवि आणि त्यांतून शृंगारिक कविता लिहिणारा; स्वाभाविकच तो तरुण पिढीच्या गळ्यांतील ताईत होऊन बसला. तो एका कविमंडळाचा अध्यक्ष होता. त्या मंडळांत पुरुषांबरोबर अनेक सुशिक्षित स्त्रियाही होत्या. मंडळाच्या बैठकी वारंवार होत व त्यांत घनश्याम आपल्या नवीन नवीन कविता मोठ्या प्रेमानें म्हणून दाखवी. एके दिवशीं सायंकाळीं सभा आटोपल्यावर घनश्याम घरीं जाण्यास निघाला. मालिनीला त्याच वाटेनें जावयाचें असल्यामुळें तीं दोघें बरोबर चाललीं होतीं. मालिनी तरुण व सुशिक्षित असून ती उत्तम कवयित्री होती. घनश्याम तिनें नुकत्याच लिहिलेल्या कवितेची स्तुति करीत होता. दोघांचेंही घर अजून लांब होतें. रस्ताही अगदीं रमणीय असून कोणालाही वाटेंत थोडी विश्रांति घेऊन पुढें जावें असें वाटणें स्वाभाविक होतें. दोघेंही जण रस्त्याच्या बाजूला मोकळें मैदान होतें त्यांत जाऊन एका लांकडाच्या ओंड्यावर बसलीं. बोलतां बोलतां घनश्याम आपल्या आवडत्या विषयाकडे वळला. त्यानें आदलेच दिवशीं लिहिलेली, 'तुला पाहिलें नव्हतें तोंवर!' ही कविता म्हणून दाखविण्यास सुरुवात केली. 'जोंवर मीं तुझ्या नेत्रांकडे पाहिलें नव्हतें तोंवर मला कमळांची प्रतिष्ठा वाटे व जोंवर तुझा मुखचंद्र माझ्या दृष्टीस पडला नव्हता तोंवरच आकाशांतील चंद्राकडे मला पहावेंसें वाटे', असा त्याच्या कवितेचा आशय होता. घनश्यामाचा आवाज अत्यंत गोड व प्रसंगाला अनुरूप असा अभिनय करण्याची कला त्याला पूर्णपणें साध्य झाली होती. मग मालिनीचें कवि-हृदय आणि त्यांत स्त्री-हृदय ती कविता ऐकतांना अगदीं तल्लीन होऊन गेलें तर त्यांत काय नवल ? सायंकाळचा मंद वारा सुटला होता. त्या वाऱ्याची झुळूक जरा अधिक शीतल असल्यामुळेंच कीं काय, गाणें ऐकतां ऐकतां मालिनी एकदम थरारली व घनश्यामाचा आवाजही कंपित झाला. गाण्याच्या भरांत दोघांनाही वेळेचें भान राहिलें नाहीं.

इतक्यांत मालिनीच्या दृष्टीस मावळती चंद्रकोर दिसली व बराच उशीर झाला असें वाटून ती जाण्यासाठीं उठली.

त्या दिवसापासून प्रत्येक सभेनंतर घनश्याम व मालिनी बरोबर घरीं जाऊं लागलीं. थोडें फिरावयास जाऊन नंतर घरीं जाऊं लागलीं. आपल्या विश्वव्यापी प्रेमाचें वर्णन व विश्वबंधुत्वाची महती एकट्या मालिनीजवळ गाण्यांत घनश्यामाला विशेष आनंद वाटूं लागला. मालिनीलाही त्याच्या अगर इतर कोणाच्या कविता वाचण्याऐवजीं प्रत्यक्ष घनश्यामच्या तोंडून त्या ऐकण्यांत कांहीं निराळीच गोडी वाटूं लागली. तो राधा-कृष्णांचीं पदें प्रेमळ स्वरांत गाऊं लागला, कीं तिचें हृदय राधामय होऊन जाई, आणि— आणि तो तिला कृष्णस्वरूपांत दिसूं लागे. उलट त्यालाही, आपली कविता हवेंत विलीन होऊन जात नसून ती प्रत्यक्ष राधेच्या हृदयांत ठाव घेत आहे असें वाटे, व त्याच्या गाण्याला फारच रंग चढे. अशाच एका संध्याकाळीं तीं दोघें त्याच लांकडाच्या ओंड्यावर बसलीं होतीं. पांढरें स्वच्छ चांदणें पडलें होतें. इकडे रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या झाडांच्या फांद्या एक-मेकींस भेटून आपल्या पानांनीं मंजुळ हास्यध्वनि करीत होत्या. तीं दोघें बसलीं होतीं तेथून जवळच एक छोटीशी नदी वहात असून तींत चंद्राचें प्रतिबिंब पडलें होतें.

"मालिनीबाई," घनश्याम म्हणाला, "हें सर्व विश्व प्रेमाचें भुकेलें आहे. प्रेम आहे तर सौंदर्य आहे आणि सौंदर्य आहे तेथें प्रेमदेवतेचें वास्तव्य असलेंच पाहिजे."

मालिनी ऐकत होती. तिनें एक पाय खालीं सोडला होता व दुसऱ्या गुडघ्यावर आपल्या दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत अडकवून त्यांवर आपली हनुवटी टेंकून ती बसली होती. वाऱ्यानें क्वचित् एखादा केंस उडून तिच्या तोंडावर दांडगाई करीत होता. मालिनी तरुण होती, सुंदर होती आणि अविवाहित होती. घनश्यामचा प्रत्येक शब्द ती आपल्या हृदयांत सांठवीत होती. त्याच्या कविता तर तिला पाठ असत.

"मालिनीबाई," घनश्याम पुढें बोलूं लागला. "मघां ते लहान लहान मुलगे आणि मुली त्या पटांगणांत खेळत होतीं, त्यांच्या हृदयांत आपपर-भावाचा लेश तरी असेल काय? या व्यावहारिक जगाचीं, रूढीचीं बंधनें

आणि पोक्तवयांतील कुचेष्टा यांचा वारा तरी त्यांना कधीं शिवत असेल काय? त्यांच्या त्या निर्व्याज, उत्कट प्रेमांतच सृष्टीचें खरें सार्थक आहे असें मला वाटतें. मालिनीबाई, तुम्हीं आम्हीं पुन्हा त्यांच्यासारखें लहान होऊन स्वच्छंदानें एकत्र वागडावें असें नाहीं तुम्हांला वाटत?"

मालिनीनें नुसती होकारार्थी मान हलविली. घनश्यामची कल्पना हृदयंगम तर खरीच; पण ती ऐकून मालिनीला जरा कसेंसेंच झालें.

"तो चंद्र पहा. कसा त्या सरितेबरोबर खेळतो आहे! सृष्टींतील या असंख्य प्रेमलीला पाहिल्या कीं, प्रेमाशिवाय आणि सौंदर्याशिवाय या जगांत कांहींच नाहीं असें वाटूं लागतें."

मालिनीनें पुन्हा एकदां मान हलविली. स्त्रीस्वभावाला अनुसरून तिचें प्रेम जितकें उत्कट तितकेंच तें मूक होतें.

थोडयाच अंतरावर त्या गांवचे कुबेर—विश्वासराव व्यवहारे—नदीकांठीं संध्येच्या निमित्तानें बसले असून या दोघांकडे व विशेषतः मालिनीकडे, डोळे ताणताणून पहात होते आणि आपल्याशींच पुटपुटत होते, "काय उल्लू पोरें आहेत हीं! मीं इतके धंदे केले, इतक्या लबाडया केल्या, पण कधीं प्रेमाच्या फंदांत सांपडलों नाहीं. उभ्या जन्मांत कधीं कुणावर-स्वतः च्या बायकोवर देखील—प्रेम केलें नाहीं, पण साऱ्या आयुष्यांत मला कधीं सुखाची वाण पडली आहे का? या जगांत मला काय कमी आहे? नाहीं-तर हीं अलीकडचीं पोरें!......"

  

"मालिनी, आतां यापुढें आपणांस या दुष्ट कुटाळ गांवांत राहणें शक्य नाहीं. जगाचें तोंड धरतां येत नाहीं."

पुन्हा त्याच जागीं, त्याच ओंड्यावर तीं दोघें बसलीं होतीं. मालिनी गुढघ्यांत डोकें खुपसून बसली असून घनश्याम जवळच तिच्या केंसावर आपली दृष्टि खिळवून बसला होता.

"मालिनी, आतां आपणांस कोठें तरी अगदीं दूर, जिथें कोणा मनुष्या-चा वाराही नसेल, जिथें चंद्रसूर्यांचेही डोळे पोहोंचूं शकणार नाहींत अशा ठिकाणीं जाऊन राहिलें पाहिजे."

"माझी ना नाहीं."

" पण माझ्या पत्नीचें–माझ्या लीलेचें–कसें होईल ? मला तिची काळजी वाटते."

" तिलाही घेऊं आपल्याबरोबर ! "

" छे ! मालिनी, ती आतांशा फार दुःखी दिसते. पूर्वींसारखी हंसत-खेळत नाहीं. तिच्या सहवासांत आपणाला आनंद होणार नाहीं. पण मग तिचें कसें होईल ? "

" याचा विचार तुम्हीं इतके दिवस कां केला नाहीं ? "

" खरें आहे; पण–पण–पळून म्हणजे आपण कुठें जाणार ? मालिनी, पुरुषांची गोष्ट वेगळी असते. बायकांना सारें जग खायला उठतें, त्यांचा अव्हेर करतें..."

" घनश्याम, ही सर्व सृष्टि प्रेममय आणि सौंदर्यमय आहे ना ? मग आपणांला कसली भीति ?

" होय, पण ती ही सृष्टि नव्हे; ती काव्य-सृष्टि; ही दगडामातीची आणि पाषाणहृदयी माणसांची सृष्टि नव्हे."

" हें मला ठाऊक नव्हतें."

" मला तरी कोठें ठाऊक होतें ? आतां या पाषाणमय जगांत आपणांला कोठें थारा मिळणार ? आपण कुठें जाणार ?..."

" मग आपण दोघेंही बरोबरच या निष्ठुर जगाच्या बाहेर जाऊं या, एकदमच या जगाचा निरोप घेऊं या. मग तर आपणांस खऱ्या काव्य-सृष्टींत प्रेम आणि सौंदर्य मोकळेपणीं लुटतां येतील ना ?–आपण राधा-कृष्णांच्या दिव्य सृष्टींत प्रवेश करूं ना ? आपल्या सान्निध्यांत मरायला मी केव्हांही तयार आहें. जाऊं या ना आपण बरोबरच ! " मालिनीचा स्वर अत्यंत केंविलवाणा व लडिवाळपणाचा होता.

" नको. मालिनी, आत्महत्त्या करणें हें पाप आहे असें म्हणतात. शिवाय, आपल्या प्रेमाचें पर्यवसान मरणांत झालेलें पाहून जग काय म्हणेल ? त्यापेक्षां..."

" त्यापेक्षां मी एकटीच या जगांतून नाहींशी झालें तर ?–घनश्याम ! मला जग कांहींही म्हणणार नाहीं. तें मला विस्मृतीच्या गुहेंत केव्हांच दडवून टाकील. घनश्याम, मी येतें हं."

ज्वालामुखीच्या पोटांतील अग्निप्रमाणें स्त्रियांच्या भावना एरव्हीं अगदीं मुग्ध; परंतु एकदां हृदयाचा बांध फोडून बाहेर निघाल्या, कीं सृष्टि-कर्त्यालाही न आंवरणाऱ्या अशा असतात. एकवार घनश्यामाच्या मुखाकडे अनिमिष लोचनांनीं पाहून मालिनी तेथून उठली, ती तीरासारखी तेथून निघून गेली. घनश्याम वेड्यासारखा तिच्याकडे पहात उभा राहिला. तिला हांका मारण्याचेंही त्याला भान राहिलें नाहीं. किंचित् शुद्धीवर येतांच तिला हांका मारीत तो तिच्यामागून जाऊं लागला. मालिनीनें एकवार मागें वळून पाहिलें व त्याला 'नको' अशा अर्थाची हुकमी खूण करून ती पुन्हा वायुवेगानें चालूं लागली व लवकरच त्याच्या दृष्टिआड झाली. घनश्याम कर्तव्यमूढ होऊन ओंड्यावर येऊन बसला व जरा वेळानें घरीं जाण्यासाठीं उठला. तिकडे चंद्र ढगांआड होऊन त्या सरितेच्या क्रीडांगणांतून नाहींसा झाला होता. वारा बंद असल्यामुळें झाडेंही मूक होतीं.

"आज घरीं यायला इतका उशीर कां ? मीं ताजीं ताजीं भजीं केलीं आहेत. जेवायच्या आधींच दोन तोंडांत टाकायचीं होतीं. कशीं काय झालीं आहेत ?"

"फारच छान झालीं आहेत. पण आणखी नकोत." घनश्यामानें खातां खातां उत्तर दिलें.



# नाट्य-विभ्रम



माझें नांव श्यामकांतराव—काय म्हणालों मी? श्यामकांतराव? होय. तेंच माझें नांव होतें—माझें नांव श्यामकांतराव पारसनीस. नांव होतें म्हणण्याचें कारण मी आतां पूर्वींचा राहिलेलों नाहीं, व लोकही मला आतां पूर्वींचाच श्यामकांत म्हणून ओळखत असतील असें मला वाटत नाहीं. हाय! हाय! पुन्हा पूर्वींचा श्यामकांत तरी व्हावें, नाहीं तर मी पूर्वीं श्यामकांत होतों हें अजीबात विसरून पुनर्जन्माचें सुख तरी अनुभवावें असें मला किती किती वाटतें! पण हें माझ्या मागचें भूत—कोणतें तेंच आज मी सांगणारे आहें—धड मला सोडीतही नाहीं व धड माझा पुरता नाशही करीत नाहीं! शेवटीं माझें काय होणार आहे देव जाणे!

तरुणपणीं मी अगदीं गरीब व आशाधारक असा होतों. आईबाप लहानपणींच वारल्यामुळें मला आतेनें वाढविलें होतें. तिचें मजवर स्वतः-च्या मुलाप्रमाणें प्रेम होतें व तिचा दराराही तितकाच होता. मी ऐतिहासिक व तात्त्विक वाङ्मय वाचीत असें; पण नाटकें, कादंबऱ्या यांचा मात्र मला तिटकारा होता. माझी आत्याही मला 'नाटकसिनेमांला कधींही जाऊं नये' असा नेहमीं उपदेश करी. तिचे ते शब्द आज माझ्या कानांत घुमत आहेत व माझ्या मेंदूंत गरगर फिरताहेत. माझें लग्न झालेलें असून बायकोही अगदीं मनाजोगी सुशील व सुशिक्षित अशी मिळाली होती. बिचारीचा बाप शर्यतीच्या नादानें सर्वस्वीं बुडून व त्यांतच वेड लागून मेला होता. आम्हां दोघांनाही एकमेकांबद्दल अत्यंत प्रेम व सहानुभूति वाटत असे—अरेरे! हा भूतकाळ जिथें तिथें नडतो आहे—वाटत असे, कारण आतां तिला मजबद्दल अभिमान वाटण्याऐवजीं माझी अतिशय लाज मात्र वाटत असेल. मी बुद्धीनें चलाख, विद्याभ्यासांत निपुण व स्वभावानें

अतिशय मनमिळाऊ व लोकप्रिय असल्यामुळें माझ्या आतेनें अगदीं लहान मुलाप्रमाणें माझें कौतुक करावें.

अशा रीतीनें आमचे दिवस अगदीं सुखांत चालले असतां, एके दिवशीं माझा एक मित्र एका अनोळखी गृहस्थास बरोबर घेऊन मजकडे आला. त्या गृहस्थाचें नांव सूर्याजीराव काळोखे. तो गृहस्थ आंत येतांच त्यानें अतिशय लीनतेनें परंतु मोठ्या रुबाबदार पद्धतीनें मला नमस्कार केला व लगेच तो मीं दाखविलेल्या खुर्चीवर बसून धूम्रपान करूं लागला. नंतर औपचारिक प्रश्न व ओळख करून देण्याचा विधि झाला. सूर्याजीराव काळोखे हे 'विश्वामित्र' साप्ताहिकाचे संपादक असून त्यांना नाट्यचर्चा लिहून देण्यासाठीं एका लेखकाची मदत हवी होती, व या कामासाठीं ते मजकडे आले होते. मी इतर विषयांवर किरकोळ लेख लिहीत असें; पण वर सांगितल्याप्रमाणें मला नाटकांची आवड नव्हती, थोडा तिट्काराच होता व अर्थातच मला त्यांत कांहीं कळतही नव्हतें.

" मला नाटकांचे बाबतींत कांहीं समजत नाहीं, तर मी त्यांचें परीक्षण कसें करणार ? " मीं विचारलें. पण त्या गृहस्थाचें तिकडे लक्षच नव्हतें. ते आपल्या सिगारेटच्या धुराकडेच पहात होते. मीं पुन्हा मोठ्यानें तेंच वाक्य उच्चारलें; त्याबरोबर एकदम दचकून त्यांनीं तीक्ष्ण नजरेनें मजकडे पाहिलें. जणुं काय इतका वेळ आपण एकटेच, स्वतःच्याच खोलींत बसलों आहों असें त्यांस वाटत असावें.

" काय म्हणालांत ? तुम्हांला त्यांत कांहीं समजत नाहीं ? वा ! वा ! मग तर फारच उत्तम ! कारण मग तुमची टीका पूर्वग्रहदूषित असण्याची मुळींच भीति नाहीं." असें म्हणून ते एकदम थांबले व लगेच, " बस्स ! ठरला तर आपला बेत." असें म्हणून त्यांनीं आपल्या खिशांतून दोन पिंवळ्या रंगाचीं तिकिटें काढून तीं जवळजवळ माझ्या खिशांत कोंबलीं. झालें ! माझ्या नेहमींच्या भिडस्तपणानें याही वेळीं उचल खाल्ली, व माझ्या अधःपाताची मुहूर्तमेढ रोंविली ! तो गृहस्थ तर माझ्या होकाराची वाट पहातच नव्हता, माझी संमति आहे असें धरूनच चालत होता. जणुं तो एखादा अंमलदार असून मला एखाद्या कारकुनाप्रमाणें हुकूम करीत

आहे ! मोठ्या नाइलाजानें त्या रात्रीं नाटकाला जाऊन दुसऱ्या दिवशीं 'विश्वामित्रा'साठीं त्यावर परीक्षण लिहून देण्याचें मीं कबूल केलें.

ठरल्याप्रमाणें त्या रात्रीं मी नाटकाला गेलों. नाटक 'पतिहत्त्या' हें होतें. माझा स्वभाव जसा भिडस्त व पापभीरु, तसेंच माझें हृदय अत्यंत कोमल व माझ्या शरीराप्रमाणेंच कमकुवत होतें. नाटकांतील निरनिराळ्या भावनाप्रधान व्यक्तींचा व हृदयद्रावक प्रसंगांचा माझ्या मनावर अत्यंत परिणाम झाला. त्यानंतर रात्रीची मला झोंप येईनाशी झाली. निरनिराळ्या पात्रांचे ते विलक्षण हावभाव, ते अंगविक्षेप, रागाचे फूत्कार, करुणरसाच्या किंकाळ्या, प्रेमाचे महापूर, कधीं अस्मानाकडे लागलेले तर कधींकधीं कोंपऱ्यांतून बाहेर पडूं पहाण्याइतके तिरके फिरविलेले डोळे, या सर्वांनीं माझ्या स्वप्नसृष्टींत धिंगाणा घालण्यास सुरवात केली. नाटक हें समाजाचेंच चित्र ना ? नाट्यसृष्टि ही खऱ्या सृष्टीचीच प्रतिकृति, आणि त्या प्रतिकृतीचें संगोपन व निरीक्षण करण्यासाठींच 'विश्वामित्रा'चा जन्म ना ? पण समाजांत इतक्या उत्कट भावना व असले हृदयभेदक प्रसंग यांचाच चोवीस तास धुमाकूळ चाललेला असतो काय ? तें नाटक पाहून मला तर असें वाटूं लागलें, कीं त्यांतील पात्रांचे सर्वच हावभाव कृत्रिम व अतिशयोक्तिपूर्ण असले पाहिजेत. त्यांना इतरांप्रमाणेंच ईश्वरनिर्मित एकेकच वाचा नसून त्यांच्या प्रत्येक अवयवाला वाचा फुटल्याप्रमाणें तीं वागत होतीं. त्यांच्या सृष्टींत विचार ही चीज नसून ती केवळ विकारांनींच—आणि तीदेखील सर्व उत्कट विकारांनींच—भरलेली असली पाहिजे. साधारण समाजांतील मनुष्य कधींही क्षुल्लक प्रसंगांनीं एकदम थिथरून जात नाहीं, प्रथम दृष्टिपाताबरोबरच प्रेमानें बेहोष होऊन मरणोन्मुख अवस्थेला पोहोंचत नाहीं, रात्रीच्या वाऱ्याप्रमाणें उसासे टाकीत नाहीं अगर वर्षाकालाच्या पावसाप्रमाणें अश्रु ढाळीत नाहीं. आपले पाय निशिगंधाच्या ताटव्याप्रमाणें अगर हात पिंपळाच्या फांद्यांप्रमाणें सारखे हालवीत नाहीं. मग नाटकांत मीं जें पाहिलें तें समाजाचें खरें दृश्य कसें ? मीं याबद्दल 'विश्वामित्रां'त खूप कडक टीका केली. संपादक खूष झाले, व त्यांनीं रोजच्यारोज मजकडे अधिकाधिक तिकिटें पाठविण्यास सुरवात केली.

पण या सर्वांचा परिणाम संपादक महाशयांना इष्ट व मला सर्वस्वीं अनिष्ट असाच झाला. मला नाटकें आवडूं लागलीं असें मुळींच नाहीं,

पण एखाद्या सर्कशींतील जनावराप्रमाणेंच मी स्वतःच्या मनाविरुद्ध नाटक-गृहाकडे ओढला जाऊं लागलों. नाटकांतील पात्रांचे कृत्रिम हावभाव, त्यांचे विविध अंगविक्षेप, त्यांची भेदक नजर, हीं सर्व माझ्या आंगांत कुत्र्याच्या विषाप्रमाणें हळूहळू भिनूं लागलीं. मी सदासर्वदा, एकटा असलों काय अगर मंडळींत असलों काय, चमत्कारिक हावभाव करूं लागलों आणि सर्वांचेकडे तिरक्या व तीक्ष्ण नजरेनें पाहूं लागलों. एकदां कपडे घालण्यासाठीं मी आपला कोट पाहूं लागलों, तों तो खुंटीवर दिसेना. मी लगेच, 'हाय! हाय! काय करूं रे? कोट सांपडत नाहीं, नाहीं तर–, असें म्हणत एक हात छातीवर ठेवून कांहींशा खिन्न व कांहींशा क्रोधयुक्त मुद्रेनें आरशांत पहात उभा राहिलों. इतक्यांत प्रभावती तेथें आली. तिला पाहतांच–नव्हे तिचें मुखकमल दृष्टीस पडतांच–अर्थात् माझा सर्व राग, सर्व खिन्नता एकदम नाहींशी होऊन तेथें प्रेमरसाचे जिवंत झरे वाहूं न लागले तर मग मीं इतके दिवस नाटकें पाहिलीं त्याचे सार्थक काय? लगेच मी मागें वळून 'ये! लाडके प्रभावति, प्राणेश्वरी, ये. मला एकदां–' ती मजकडे भयभीत मुद्रेनें पाहूं लागली. साधारणतः आपल्या समाजांत बायकोचें नांव घेण्याची देखील पंचाईत, मग त्या नांवाची एकेक विशेषणात्मक पुनरावृत्ति ऐकून बिचारी भांबावून गेल्यास काय नवल? ती त्याच पावलीं मागें फिरली. त्याबरोबर मी एखाद्या नादानाप्रमाणें तिचा हात धरून व तिच्यापुढें गुढघे टेंकून, 'नको! सुंदरी, मजवर असा कोप करूं नको?' ( आम्हां दोघांच्या एकत्र फोटोकडे बोट दाखवून ) 'तें चित्र पहा आणि हें चित्र पहा!' असें बड-बडूं लागलों. दार सताड उघडें, बाहेर तिचीच बहीण कायसें शिवीत बसली होती. तिच्याकडे माझी नजर जातांच मला नाटकांतील दासी मनश्चक्षूसमोर दिसूं लागली, व लगेच आमच्या स्वारीनें, 'कोण आहे रे तिकडे? कुमुद, सर्वांना झोंपा लागल्या कीं काय? खालून स्वच्छ वाळ्याचें पाणी घेऊन ये पाहूं!' असा हुकूम सोडला व तक्क्याला टेंकून बसावें तसा मी कलंडलों. तेवढ्यांत माझा हात सोडवून प्रभावती खालीं गेलीच. तेव्हां-पासून ती फारशी माझ्या वाऱ्याला उभी राहीनाशी झाली. बरोबरच आहे, माझ्या अंगांत इतकें भयंकर वारें शिरलेलें, मग तिनें तरी माझ्यासमोर

टिकाव कसा धरावा ? एकदां एक अगदीं साधारण ओळखीचा मनुष्य मला रस्त्यांत भेटला. त्याबरोबर अगदीं फार दिवसांचा जिवलग मित्र भेटल्याप्रमाणें दर्शवून, 'अरे यार, फार दिवसांनीं भेटलास रे' असें म्हणत मीं त्याच्या गळ्यांत हात घातला ! उलट त्यानेंही माझी मानगुटी धरून मला ढकलून दिलें नाहीं हा त्याचा केवढा चांगुलपणा ! सारांश काय कीं, माझ्या सर्व भावना शक्य तितक्या उत्कट व सर्व हालचाली शक्य तितक्या कृत्रिम रीतीनें मी दर्शवूं लागलों. मी रस्त्यानें जात असतां प्रत्येकजण मला टाळूं लागला व आजूबाजूच्या खिडक्यांतील लोक मजकडे पाहून गालांतल्या गालांत हंसून एकमेकांत कुजबुजूं लागले. प्रत्यक्ष संपादक काळोखे मजपासून आपलें तोंड दडवूं लागले. मात्र तिकिटें पाठविण्याचा त्यांचा सपाटा व नाटकें पहाण्याचा माझा सपाटा पूर्वींप्रमाणेंच, नव्हे अधिकाधिक प्रमाणांत चालला होता. अलीकडे तर मी नाटकांखेरीज फारसा बाहेरच पडत नाहीं. माझ्या मनाला सर्व कांहीं समजतें आहे, मी अगदीं पशूप्रमाणें वागत आहे हें मी ओळखून आहें व माझा नाटकांविषयींचा तिरस्कारही अजून पूर्वींइतकाच कायम आहे. पण काय करूं ? माझा कांहीं उपायच चालत नाहीं. शरीर मनाचे ताब्यांत राहण्याऐवजीं माझें मनच माझ्या शरीराच्या पूर्णपणें आधीन झालें आहे. मी या नाट्य-परीक्षणाच्या कामाला अगदीं वैतागून गेलों आहें. मीं सातआठ वेळां संपादकांकडे माझ्या कामाचा राजीनामा पाठविला; पण ते मुळीं त्याकडे लक्षच देत नाहींत. फक्त एकदां, 'असें करणें शिष्टाचाराविरुद्ध आहे' असें त्यांनीं मला उत्तर पाठविलें. जणुं काय, मी अगदीं शिष्टाचाराप्रमाणेंच वागत आहें ! तसाच भिडस्तपणानें स्वतःच्या मनाविरुद्ध, एखाद्या यंत्राप्रमाणें मी अजून नाटकाला जातों व परीक्षण लिहून देतों. माझ्या वागणुकींत यत्किंचितही नैसर्गिक छटा राहिलेली नाहीं. माझी प्रत्येक नजर, प्रत्येक हालचाल, एखाद्या नामांकित नटानें कित्ता गिरवावा अशी होऊन बसली आहे. मी एकटा नाटकांतील सर्व पात्रांचीं कामें करीन इतकी माझी कर्तबगारी—हाय हाय ! आग लागो त्या कर्तबगारीला !—इतकी माझी कर्तबगारी आहे. जर का मला तरुणपणीं गाण्याचा यत्किंचित् नाद असता तर माझ्या हावभावांना त्याची जोड मिळून मी एखाद्या शुद्ध वेडप्याप्रमाणें

रस्त्यानें गात गात चाललों असतों व वाटेंत भेटणाऱ्या प्रत्येक युवतीपुढें गुढघे टेंकून माझी संगीत प्रेमयाचना केली असती. माझ्या या करुणास्पद दशेनें बिचाऱ्या प्रभावतीची अवस्था किती तरी अधिक करुणास्पद झाली असेल बरें ! मला हें सारें समजतें आहे. तिचा हा हल्लींचा बेभान पति मरून जाऊन तिचा पूर्वींचा श्यामकांत जिवंत होईल अशी तिला व मला स्वतःलाही किती दिवस आशा होती; पण दिवसानुदिवस हें नाट्य-विभ्रमाचें भूत मला अधिकाधिक जवळ ओढून आमच्या आशेला अधिकाधिक दूर लोटीत आहे. अखेर या शरीराबरोबरच नवा व जुना दोन्ही श्यामकांत एकदम त्या भुताच्या मगरमिठींतून सुटणार असें दिसतें. देव करो आणि हें तरी लवकर घडून येवो, म्हणजे माझ्या कुटुंबांतील माणसांना निदान घरांत तरी स्वच्छंदानें वावरतां येईल !



# ईश्वराची इच्छा !



"एक, दोन, तीन—खलास." कालीचरण पेटींतील नोटा मोजीत आपणाशींच पुटपुटला. "आज तारीख दहा. आणखी बरोबर एकवीस दिवसांनीं गुलाबचंद पुन्हा येणार त्याला काय सांगावें? आतां हे सारे तीस रुपये शिलक आहेत. त्याच्या हातावर निदान शंभराचा तरी एक हप्ता टाकलाच पाहिजे. हें व्हावें कसें?" कालीचरण असा विचार करीत आहे, इतक्यांत बाजूचें दार किंचित् किलकिलें होऊन "चहा निवून चालला ना? लवकर यायचें होतें" असे अत्यंत प्रेमळ स्वरांत उच्चारलेले शब्द त्याच्या कानीं पडले. लगेच त्यानें त्या नोटा पेटींत टाकून तिला कुलूप लाविलें व तो आंतल्या खोलींत गेला. आंतली खोली म्हणजे कालीचरणचें घर व बाहेरची खोली म्हणजे त्याचें लहानसें स्टेशनरीचें दुकान होतें. कालीचरण आंत जातांच त्याच्यापुढें चहा व थोडें न्याहारीचें ठेवून मृणालिनी जवळच उभी राहिली. कालीचरण चहा पीत होता खरा; पण त्याचें लक्ष मुळींच तिकडे नव्हतें, हें मृणालिनीच्या लक्षांत यावयास मुळींच वेळ लागला नाहीं. एकदां तर बशींत चहा ओतून तो नुसताच त्याकडे पहात स्वस्थ बसला. मृणालिनीला राहवेना.

"आपणांला कांहीं होत आहे का आज?"

"छे. तसं कांहीं नाहीं. किंचित् डोकं दुखतं आहे, इतकंच."

"मग थोडी सुंठ नाहीं तर......"

मृणालिनी इतकें बोलत आहे इतक्यांत, "मालक कुठें आहेत हो दुकानाचे?" अशी हांक त्यांच्या कानीं आली. लगेच कालीचरण पाटावरून उठला व बाहेर दुकानांत निघून गेला. बशींतला चहा तसाच राहिला व सुंठही कपाटांतच राहिली. त्या गिऱ्हाइकाला आपण घरांत गेल्यामुळें विनाकारण ओरडावें लागलें हें धंद्याच्या दृष्टीनें बरें झालें नाहीं असें कालीचरणला वाटलें व पुन्हा असें होऊं नये म्हणून तो दुपारपर्यंत आंत गेलाच

नाहीं. एरव्हीं कालीचरणाच्या पेल्यांतला थोडा तरी चहा भांडून घेतल्या-वांचून मृणालिनीला राहवत नसे, पण आज तो त्याच्या तोंडापुढून ओढ-लेला चहा पिण्याचें तिच्या मुळींच मनांत येईना. त्या मेल्या गिऱ्हाइकाला अगदीं त्याच क्षणीं यायला कसें फावलें, असा विचार मृणालिनीच्या मनांत आला, पण त्या बिचाऱ्या गिऱ्हाइकाला दोष देण्यांत आपण केवढा अन्याय करीत आहों, हें लगेच तिच्या लक्षांत आलें. त्या माणसाचें आपल्याच दुकानावांचून काय आडलें आहे ? हें नाहीं दुसरें. आपण मात्र आज गिऱ्हाइकांवांचून ठार बुडण्याच्या बेतांत आलों आहों. शिवाय आपण जर दुकान उघडलें आहे तर त्यांत नेहमीं हजर असणें हें आपलें कर्तव्यच आहे, त्यांत कांहीं आपण कोणावर उपकार करीत नाहीं. आतां आपणाजवळ नोकरचाकर नाहीं, तेव्हां स्वतःच-नोकरांचा विचार मनांत येतांच मृणालिनीच्या डोळ्यांना पाणी आलें. आज दोन वर्षांपूर्वी घरांत एक व दुकानावर एक; दोन गडी राबत होते. पण दुकानाला आग लागल्या-पासून द्रव्याच्या अभावीं दोघांही गड्यांना रजा द्यावी लागली होती, व तेव्हांपासून दैवानेंच पाठ फिरविल्यामुळें या नवीन जागेंत दुकानही चांगलें चालेनासें झालें होतें. या गतकालांतील वैभवाचीं चित्रें डोळ्यांसमोर येऊन मृणालिनीचें चित्त बरेंच अस्वस्थ झालें, पण तें क्षणभरच. स्त्रियांची शक्ति मर्यादित; परंतु मन-आणि तेंही विशेषतः अडचणीच्या प्रसंगीं-फारच खंबीर आणि सहनशील असतें. मृणालिनीनें लगेच आपले डोळे पुसले व ती आपल्या कामाला लागली. थोड्याच वेळांत तिची नेहमींची आनंदी वृत्ति तिच्या मुद्रेवर पूर्णपणें दिसूं लागली.

दुपारींदेखील कालीचरण नीट जेवला नाहीं, व जेवल्यावर फारशी विश्रांति न घेतां पुन्हा दुकानांत जाऊन बसला. सकाळीं मोजतांना कदाचित् आपली चूक तर झाली नसेलना, म्हणून त्यानें पेटी उघडून पुन्हां नोटा मोजून पाहिल्या. पण कितीदां मोजून पाहिल्या तरी त्या तिनींच्या चार थोड्याच होणार होत्या ! नाहीं म्हणायला सकाळीं आठ-बारा आण्यांची किरकोळ विक्री झाली होती, तेवढी काय ती पेटींत भर पडली होती. अशा कांसवाच्या गतीनेंच विक्री होत गेल्यास काय होणार? पोट भागण्याचीच पंचाईत, मग गुलाबचंदाचें देणें वारणें तर दूरच राहिलें.

कालीचरणास कांहीं सुचेना. तो अगदीं विचारांत गुंग होऊन गेला. या जागेंत त्यानें नुकतेंच दुकान उघडलेलें, व समोरच्याच बाजूस 'मेसर्स नवलाखे, मोतीचंद आणि कंपनी'चें भलें मोठें स्टेशनरीचें दुकान पुरातन काळापासून तेथें ठाणें देऊन बसलेलें. त्यांचीं तीं कांचेचीं कपाटें, त्यांत आणून सोडलेले विजेचे दिवे, तो स्वतंत्र पैसे घेण्याचा पिंजरा, ते एकजात पोषाखाचे नोकर, इतका भपका टाकून आपल्या या खुराडेंवजा दुकानांत पाऊल तरी कोण घालणार ? बरें, आपण एकदां 'सेल' सुरू केला तर ? पण हांका मारायला आपल्या दुकानांत जुना माल तरी कितीसा आहे ? शिवाय, आपण सेल सुरू करतांच नवलाखे आणि कंपनीनेंही सेल सुरू केला तर ? मग मात्र त्यांचा खेळ होऊन आपलें उद्यांचें मरण आजच ओढवायचें ! असले आसुरी उपाय करणें हीं आपल्यासारख्यांचीं कामें नव्हत, असें मनांत येऊन कालीचरणनें तो विचार लगेच रद्द केला. पण अशानें त्याची काळजी थोडीच दूर होणार होती ? खिन्न व मत्सरग्रस्त चित्तानें समोरच्या दुकानांतील गर्दीकडे पहात कालीचरण दुकानांत बसून राहिला होता. संध्याकाळीं साताचे सुमारास झकपक पोषाख केलेले, परंतु खिशानें पोकळच, असे एक सोकाजीराव दुकानांत खरेदीसाठीं आले, व आंत जरासा काळोख पाहून, 'इलेक्ट्रिक् लाइट नाहीं वाटतें अजून घेतलांत ?' अशी प्रस्तावना करून त्यांनीं हातरुमाल काढावयास सांगितलें. कालीचरणनें आपल्या दुकानांतले चांगल्यापैकीं सुती हातरुमाल एकामागून एक त्यास दाखविले. बराच वेळ त्यांवरील काठ्यांचे रंग सोकाजीरावांस पटेनात. नंतर रंग पटला, पण इतक्यांत त्यांस काय वाटलें कोणास ठाऊक, ते म्हणाले, "छे ! हे सर्व हातरुमाल फारच 'रफ्' आहेत. तुमच्याजवळ रेशमी असले तर दाखवा." लगेच कालीचरणानें ते सर्व हातरुमाल बाजूस ठेवून त्यांस रेशमी हातरुमाल दाखविले. माल पाहून सोकाजीराव तर खूष झाले, पण त्या हातरुमालांची किंमत सुती हातरुमालांपेक्षां ज्यास्त सांगितली, तें मात्र त्यांस आवडलें नसावें. बराच वेळ माल उलथापालथा करीत तेथें घुटमळून "या दोन्हींच्या मधले नाहींत का तुमच्याजवळ ?" अशी त्यांनीं पृच्छा केली. आतां या दोन्हींच्या मधले म्हणजे आपणांस काय कातड्याचे हातरुमाल हवे आहेत कीं काय असें त्यांस विचारण्याचें कालीचरणाच्या अगदीं ओठांवर आलें होतें; पण

गिऱ्हाईक तेवढें सभ्य व दुकानदार तेवढे हलकट-नव्हे दुकानदार म्हणजेच हलकट, ही सर्वसाधारण समाजाची व्याख्या कालीचरणला पूर्णपणें माहीत होती. त्यानें मोठ्या कष्टानें आत्मसंयमन केलें, इतकेंच नव्हे तर अत्यंत लीनतेनें व स्मितपूर्वक त्या दोन्हींच्या मधली तऱ्हा आपणांजवळ नसल्याचें कळविलें. सोकाजीरावांनीं लगेच आपला वेळ फुकट गेल्याबद्दल नाखुषी दर्शवून तेथून पाय काढला व 'नवलाखे आणि मोतीचंद' यांच्या 'फर्म'मध्यें प्रवेश केला. तेथून बहुतकरून त्यांनीं तसलेच सुती हातरुमाल दीडपट किंमतीला खरेदी करून त्यांच्या दुकानांतील इलेक्ट्रिक लाइटचें सार्थक केलें-म्हणजे बिल भरलें-असावें. कालीचरण अधिकच खिन्न झाला. रात्रीं दुकान बंद करीपर्यंत एकदोन फण्या, थोडेसे केंसांत घालण्याचे आंकडे व एक साबणाची वडी यांखेरीज कांहीं विक्री झाली नाहीं. रात्रीं मात्र कसेंही करून कालीचरणाची खिन्नता घालवावयाचीच असा मृणालिनीनें निश्चय केला होता. जेवल्यानंतर अत्यंत मृदु शब्दांत ती त्याला म्हणाली, "असा काय अगदींच धीर सोडावा ? कांहीं तरी होईलच होईल. ईश्वराला आपली काळजी नसेल का ?"

'कसला आला आहे ईश्वर ! ईश्वर यदाकदाचित् असलाच तर तो मेलेला, निदान निजलेला तरी खास असला पाहिजे, नाहींतर आपली इतकी हलाखीची स्थिति त्यानें कधींच दूर केली असती-करावयास पाहिजे होती' असे विचार कालीचरणाच्या मनांत आले, पण ते मृणालिनीजवळ बोलून दाखविण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. तिनें त्याला आकस्मिक रीतीनें श्रीमंत झालेल्या लोकांच्या अनेक गोष्टी सांगितल्या व आपलेंही दैव असेंच उघडणार नाहीं म्हणून कशावरून, असें परोपरीनें सांगून त्याला जरा खुषींत आणलें. कालीचरणालाही तिचें म्हणणें अगदींच खोटें नाहीं असें वाटून तो त्याच दिशेनें विचार करूं लागला व लवकरच त्याला झोंप लागली. झोंपेंत त्याला असें स्वप्न पडलें कीं, नवलाखे आणि कंपनीच्या दुकानाला आग लागल्यामुळें तें बंद असून, त्यांच्या दुकानांत नेहमीं माल घेणारीं दोनतीन गिऱ्हाइकें वस्तरे घेण्यासाठीं आपल्या दुकानीं आलीं आहेत. कालीचरणास मनांतून फार आनंद झाला. विशेषतः, त्या जातीचे वस्तरे नवलाख्यांच्या व आपल्या दुकानांखेरीज कोठें शिल्लक नसल्याचें त्याला माहीत होतें व

आतां नवलाख्यांचें दुकान कांहीं दिवस तरी बंद राहणार ही त्याची खात्री असल्यामुळें, तोंपर्यंत तरी हे वस्तरे सवाई किंमतीला विकतां येऊन आपला बराच फायदा होईल अशी कालीचरणला फार आशा वाटली. मोठ्या उत्साहानें वस्तरे काढून तो गिऱ्हाइकांस दाखवीत होता, व एकीकडे नवलाख्यांचें दुकान जळल्याबद्दल त्यांच्याजवळ सहज नक्राश्रु ढाळीत होता. इतक्यांत एका गिऱ्हाइकाच्या हातून आपल्याच पायावर वस्तरा पडून पायाला जखम झाल्यामुळें तो ओरडूं लागला व त्यामुळें कालीचरणच्या सुखस्वप्नाचा भंग झाला. जरा डोळे चोळतांच, नवलाख्यांचं दुकान पूर्ण शाबूत असून आपल्या डोक्यांत मात्र आग पेटली आहे असें कालीचरणच्या लक्षांत आलें. या विचारामुळें कालीचरण अगदीं चिडून गेला, व त्यानें 'आपणांला झोंप येत नाहीं का ?' या मृणालिनीच्या अगदीं सरळ व प्रेमळ प्रश्नास, 'मला कांहींएक विचारूं नकोस जा', असें त्रासिकपणाचें उत्तर दिलें.

तेव्हांपासून कालीचरणाचा स्वभाव अधिकाधिकच त्रासिक व चिडखोर बनत चालला. जसजशी पहिली तारीख जवळ येत चालली तसतसा तो बायकोवर, गिऱ्हाइकांवर व एकंदर सर्व जगावर संतापूं लागला. एक दिवस त्याच्या दुकानाशीं एक भिकारी आला, व "बाबा, एक दिडकी द्या, ईश्वर तुम्हांला सुखांत ठेवील," असें म्हणूं लागला. त्याबरोबर कालीचरण संतापला, व "जा ! जा ! ठाऊक आहे तुझा ईश्वर" असें त्याच्या अंगावर ओरडला. इकडे मृणालिनीलाही सावकाराचें देणें फिटण्याची आशा वाटेनाशी झाली व कालीचरणला उगीच खोटी आशा दाखविण्याऐवजीं, "ईश्वराची इच्छा असेल तसें होईल; याहून वाईट स्थिति आली तरी तिला आपण तयारच आहोंत; मी स्वतः चार काबाडकष्ट करीन, त्यांत काय आहे मोठेंसें ? आपणांपेक्षां अधिक वाईट स्थितींत कितीतरी लोक आहेत, त्यांच्याकडे पहावें," असा त्याला उपदेश करूं लागली. आपणांपेक्षां अधिक वाईट स्थितींत इतर कोणी असतील हें म्हणणें कालीचरणला पटेना व ही 'ईश्वराची इच्छा' ऐकून तर तो अगदीं कावून गेला. आपद्ग्रस्त जनांच्या दुःखांवर डागण्या देण्याकरितांच हा ईश्वर आणि त्याची इच्छा यांचा जन्म आहे असें त्यास वाटूं लागलें. मृणालिनी मात्र मनांतल्या

मनांत दुःख करीत व देवाची करुणा भाकीत काळ कंठी व संधि सांपडेल तेव्हां तेव्हां कालीचरणला धीर देण्याचा यत्न करी.

होतां होतां पंचवीस तारीख उजाडली. आजपासून सहाव्या दिवशीं गुलाबचंद येणार व पैसे न मिळाल्यास दुकानास, व अर्थात् घरासही कुलूप लावून त्यावर शिक्कामोर्तब ठोकून चालता होणार. त्याचें एकंदर पांचशें रुपये देणें निघत होतें. आपल्या सर्व सामानाचा लिलांव झाला तर त्याचें देणें फिटून आपल्या हातांत फारतर पांचपंचवीस रुपये उरतील, असा हिशोब करीत कालीचरण व मृणालिनी घरात बसलीं होतीं. इतक्यांत बाहेर तारेचा शिपाई येऊन कालीचरणास पुकारूं लागला. तार आणि ती आपणांस? कालीचरण अगदीं गोंधळून गेला. त्याला मायेचा पाश असा मृणालिनीखेरीज कांहींच नव्हता. मृणालिनीलाही आईबाप नव्हते. नाहीं म्हणायला एक लांबची चुलती, आत्या व त्यांचीं मुलें होतीं. तार गुलाबचंदाकडून आली असून तींत आपणांस सर्व कर्जाची माफी आहे असा तर मजकूर नसेलना? किंवा मृणालिनी नेहमीं म्हणत असते त्याप्रमाणें एकादा दामाजी तर आपलें संकट निवारण करण्यास अकल्पित रीतीनें धांवून आला नसेलना? अशा तऱ्हेचे शेंकडों विचार त्या क्षणांत कालीचरणच्या मनांत येऊन गेले. मृणालिनीचेंही चित्त 'तार' हा शब्द ऐकतांच अत्यंत अस्वस्थ होऊन गेलें. कांपऱ्या हातांनीं कालीचरणनें तार फोडली व ती अर्धवट वाचूनच तो एका खुर्चीवर मट्कन बसला. तार मृणालिनीच्या चुलतीच्या एका शेजाऱ्यानें केली असून तींत पुढील मजकूर होताः—'मृणालिनीबाईची चुलती, आत्या व त्यांचीं तिन्ही मुलें घरावर वीज पडल्यामुळें सर्व एकदम मरण पावलीं हें कळविण्यास दुःख वाटतें. दुसरें कोणी नात्याचें नसल्यामुळें तुम्हीं ताबडतोब निघून यावें'.

तारेंतील मजकूर ऐकतांच मृणालिनी ढसढसां रडूं लागली. कालीचरणचा चेहेराही बराच उतरला. पण त्याच्या दुःखाचें कारण त्या सर्व मंडळींच्या मृत्यूपेक्षां मृणालिनीला होत असलेलें दुःख हेंच अधिक होतें. मृणालिनीचा दुःखावेग जरा ओसरल्यावर तिचें सांत्वन करण्यासाठीं कालीचरण बोलूं लागला. "हं! ईश्वराची इच्छा! आपण माणसें काय करणार?"

आणखी थोडा वेळ गेला. दोघेंही जण प्रवासाची तयारी करूं लागलीं

'दुसरे कोणी नातलग नसल्यामुळें' हे तारेंतील शब्द दोघांच्याही—विशेषतः कालीचरणच्या डोक्यांत घोळूं लागले, पण दोघांपैकीं एकालाही त्यासंबंधीं बोलण्याचें धैर्य होईना. पण गप्प बसून थोडेंच भागणार होतें? ईश्वराची इच्छा, तिला मान वांकविलीच पाहिजे. मृणालिनीच्या चुलतीच्या मालकीचीं रहात्या घराखेरीज आणखी कांहीं घरें होतीं व त्यांच्या भाड्याचें उत्पन्न दरमहा सुमारें शंभर रुपये येत असावें हें कालीचरणास माहीत होतें.

पहिल्या तारखेस कालीचरण मृणालिनीसह घरीं परत आला. दोघेंही त्या अपघाताची हकीकत व आतांच्या मृत्यूचें दुःख जवळजवळ विसरूनच गेलीं होतीं. गुलाबचंदाचें स्वागत कालीचरणनें स्मितपूर्वक केलें व त्यास एक चहाचा पेला व शंभराची नोट दिली. बोलतांबोलतां सहज त्यानें गुलाबचंदाला अपघाताची हकीकत सांगितली. गुलाबचंदानें रीतिप्रमाणें केलेलें, 'गोपालकृष्णाची मर्जी!' हें सांत्वनही कालीचरणला पूर्णपणें पटलें.

## संपूर्ण

